







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य कला-विलास

एप्रिल १९६८ • वर्ष २४ वे • मूल्य १। रु.

## श्रे य ना मा व लि–

अतृप्ता.....मदनमस्त तरुणीची ढंगदार (अ) प्रीतिकथा–**श्रीधर घैसास** • **एल्. पी. जाय**...क्रिकेट-क्षेत्रातला अमोल हिरा–**दि. वि. आमोणकर** • **कहाणी एप्रिल फूलची**...गंमतीदार लेख–**ह. शि. खरात** • **शिळी**....बहारदार कथा–**प्रा. अंबिका सरकार** • **आशा**....संकटग्रस्ताना आशा दाखविणारी करुण कहाणी–**सौ. विजया काळे** • **प्रीत पिऊनिया मोही रिती**....धुंद जीवनाची रम्य प्रणयकथा–**निवेदक–प्रभाकर अत्रे** • **साहित्यिकांचा गुढीपाडवा**....खुसखुशीत विनोदगर्भ लेख –**वसंत देशमुख** • **दिवाळी अंकातील कथा साहित्य**....परामर्श घडविणारा वाचनीय लेख– **प्रा. य. दि. फडके** • **दिवाळी अंकातील कादंबऱ्या**....वाचनीय कादंबऱ्यांचे दर्शन घडविणारा लेख– **दा. गो. देशपांडे** • **दिवाळी अंकातील विनोदी साहित्य**....विनोदपूर्ण साहित्याचा आढावा घेणारा लेख–**शां. शं. रेगे** • **गोपाळकृष्ण भोबें क**....एक कोंकणी कविता––**र. वि. पंडित** याशिवाय रंगमंच, सन्मानपुष्पे, दीपमाला, इंद्रधनुष्य, वात्रटिका इ. इ. आणि

## राजकारणातले "एप्रिल फुल"

**मर्मभेदक मासिक व्यंगचित्रमाला**

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

Gram: Dalalart
टे. नं. ३५७७६५

★ संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. यानी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ६० पै. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN/1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४

टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्याचे** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्य शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो गिऱ्हाईकांच्या इच्छे-नुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात यते. तरीहि तांत्रिक अडचणी-मुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्था-पकावर नाही.

संपादक, मालक, मद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनी स्टट्स पीपल प्रस, जन्मभमी भवन, घोगा स्ट्रीट, फोट, मंबई १ यथ छापून, दलाल आट स्टूडिओ, ४२ केनडी ब्रीज, मंबई ४ यथे प्रसिद्ध केले.


# मूर्खांच्या नंदनवनात

शहाण्यांप्रमाणे मूर्खांचेही एक नंदनवन असते. त्या नंदनवनाच्या दाराशी जाणारी माणसे शहाणी-सुरती असतात. पण त्या नंदनवनात ती गेली की, मूर्खपणाच किती ( व कसा) चांगला आहे हे तो शहाण्या-शहाण्यांना पटवून देण्याचा प्रयत्न करू लागतात. शहाणे वारंवार सांगतात, "अहो, किती झाले तरी हे मूर्खांचे नंदनवन. ह्यातल्या अप्सरा खोट्या, मद्य खोटे, फसवे. ह्यातले (तथाकथित) 'शांतता' गायन खोटे, त्यातले प्रेमाचे फतवे खोटे, मैत्रीचे नाव घेऊन मारलेल्या मिठ्या खोट्या, त्यातली वचने खोटी, संकल्पही खोटे." पण नंदनवनाच्या कल्पनेचा कैफ हा शुक्राचार्यांच्या मद्याच्या कैफापेक्षा मोठा ठरतो आणि मग जातो शब्द – सार्वमत घेऊ, लवादाचा निर्णय मान्य करू. आमचीच भूमी असली तरी 'नो मॅन्स लॅण्ड' म्हणून राखून ठेवू. दिलेले प्रत्येक दान अभिमंत्रित करून देऊ (पार्लमेण्ट आपलीच की, "हात वर" की "झाले (सफेत) हात वर !!") राजकारणात हा लपंडाव, ही शिवाशिवी चालूच असते. जे मनात असते ते ओठात न येऊ देणे ह्याचा अर्थ राजकारण. मग कुणीतरी बाई त्या नंदनवनाच्या नाक्यावर उभी राहून म्हणते, "आम्ही त्याना कसे झकास बनवले. दे हॅव बीन फूलड्" नंदनवनातले बाकीचे बघे एकसाथ "ताली" बजावतात. 'की जय' च्या घोषणा होतात. दुसऱ्या नाक्यावरला एखादा तगडा माणूस मिशा पिंजारीत उठतो. म्हणतो–"फारसं न लढता आम्ही काय झकास जिरवली आहे. मूर्ख लेकाचे. ज्यांना साधे नकाशे सांभाळता येत नाहीत, त्यानी 'इंच इंच लढवू'च्या गप्पा शाळकरी पोरांच्या मेळाव्यात माराव्या. त्याना बनवावे. कारण ते वय बनण्या–बनवण्याचेच असते." राजकारणात हेच चालते. असेच चालते. असेच चालायला हवे असते. विल्सन साहेबानी टांग मारली आणि आम्ही कच्छच्या रणाचे राजे ठरण्याऐवजी मूर्खांच्या नंदनवनातले 'फर्जी' झालो. कोसीजिनने चाबूक फटकारला आणि ताश्कंदला कंदमुळे खात खात आम्ही रणातून माघारे फिरलो. ११ जानेवारीला आणले विमानातून ते शास्त्रींचे शव नव्हते, शांतीचे शव होते. पण मूर्खांच्या नंदनवनात उभे राहून आम्ही मात्र म्हणत होतो "लाल पायघड्यावरून शांति घरी येत आहे." मूर्खांच्या नंदनवनातला आणखी एक माणूस तूर्त मोकाट सुटला आहे. आणि दिल्लीच्या राणीसाहेबा म्हणत आहेत की 'खूप नव्या शक्यता दिसत आहेत.' नव्या शक्यता बरं का? तुम्ही पेपर वाचता ना ? श्रीनगरच्या विमानतळावरचे स्वागत व भाषणे ऐकलीच असतील. निदान वृत्त तरी ! मग वजीर, प्यादे, फर्जी सांगत सुटले आहेत "तसं भिण्यासारखं काही नाही मंडळी !" असंच ही मंडळी १९४६, १९४७ साली सांगत होती. आणि मग लाखो माणसे 'मूर्ख' बनवली गेली. त्यांना मग आम्ही म्हणालो "शरणार्थी, निर्वासित"! नेफाच्या वेळी आमची फारच जय्यत तयारी होती (म्हणे) एके दिनी चमत्कार जाहला. आम्ही 'मूर्ख' ठरलो. मूर्खांच्या नंदनवनात सदैव रत असणारे राज्यकर्ते लाभल्यावर आपल्याला हेच वैभव वाट्याला येणार ! ह्या नंदनवनातले ऋत्विज सारे कसे अगदी वेदशास्त्रसंपन्न ! ज्ञानी ! प्रज्ञावंत !! जे जे घडते तेच कसे शहाणपणाचे (व शांततेचे) हे पटवून देण्यात पटाईत ! त्यामुळे ह्या नंदनवनात आपण कसे अगदी सुखेनैव रहात आहोत. व बनत आहोत. अरब–मूर्ख लेकाचे. लढून भूप्रदेश गमावतात. आम्ही कसे ? (स्वतःच्या) रक्ताचा थेंबही न सांडता भूप्रदेश गमावतो. तो सुद्धा सहा दिवसात नाही. सतत वीस वर्षे आम्ही गमावीतच आहोत. आहे हिंमत ! शक्यच नाही. कारण ? तुम्ही आमच्या नंदनवनात अजून आला नाहीत. या ! मूर्खांच्या ह्या नंदनवनात या. असे अनेक 'चमत्कार' बघायला मिळतील. कुठलीही वस्तु स्वस्तात घेऊन सरकारी छाप मारून महाग करण्याची किमया तुम्हाला ठाऊक आहे ? ह्या नंदनवनात गाड्या कुणासाठी थांबतात आहे ठाऊक? चोरट्या (भुरट्या) तांदूळवाल्यासाठी ! आणि मित्रांना (बंदुकीच्या) गोळ्या आणि भक्षकांना मलिदा दिला जातो – आहे ठाऊक ? अहो ! हे असंच आहे. असंच चालायचं!! काही खरं नाही बघा !!

कारण हे मूर्खांचं नंदनवन आहे !! (टेक इट् लाइटली ! हा 'एप्रिल फूल' अंक आहे. आलं ना लक्षात ?)

—संपादक







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




## पक्षगोणपाटात भरा याला चुरचुरीत उत्तर

स. न. वि. वि.

नेहमीप्रमाणेच आपल्या ह्याही महिन्याच्या अंकाचे पारायण झाले व विशेष लिहिण्यास प्रवृत्त झालो तो श्री. अरूण साठे यांच्या पत्राने, हे पत्र आपण चर्चेसाठी वाचकांसमोर ठेवले आहे. एक नियमीत वाचक ह्या नात्याने थोडेफार त्यावर भाष्य करण्याचा अधिकार आहे असे मी मानतो.

सदरहू पत्र खरोखरीच कळकळीने लिहीले आहे व आशयही विचाराहं आहे ही आपली मते मलाही पटली. परन्तु पत्राचा समतोल ढळला आहे हे अगदी उघड व्यक्त होत आहे. एका टोकाला जाउन हे विचार मांडण्यात आले आहेत.

हिन्दुस्थानात राहून ह्या देशाला आम्ही उघड "हिन्दुस्थान" म्हणू शकत नाही ह्याचे आम्हालाही वाईट वाटते. आमच्या देशात राहून, आमचे राज्य असून कित्येक आमच्या हितावह गोष्टीना आम्ही पारखे झालो आहोत हा अंधार आम्हालाही उघड डोळ्यानी बघावा लागत आहे. पण त्याचा अर्थ असा मुळीच नाही की, सबंध समाजाची घडी एकदम उघळून लाऊन आम्ही आमचे "हिन्दूत्व" सिद्ध करू शकू.

श्री. साठे यांनी पत्रात केवळ जातीयतेवरच लक्ष ठेवून विचार मांडले आहेत. केवळ जन्माने हिन्दू ते हिन्दू अन् बाकी सर्व अहिन्दू अशीच त्यांनी सुटसुटीत व्याख्या केली असावी. "हिन्दू" या फार महान शब्दाची व्याख्या सुद्धा महानच असणार. स्वामी विवेकानन्दांसारख्यांचा जन्म केवळ हिन्दू धर्मासाठीच होता. त्यांनी केलेली व्याख्या पाळणं हाच त्या शब्दाचा खरा न्याय ठरेल.

आपल्या राज्यकर्त्यांनी (!) पहिल्यापासून आपली राजनैतिक व सामाजिक घडण बसविताना घटनेपासूनच काही घोड चूका करून ठेवल्या आहेत. पण त्या आपल्यालाच सुधारावयास हव्यात. कारण ते आपलेच दात व आपलेच ओठ आहेत.

देशातील मुसलमान देशबुडवे आहेत, त्यांना राष्ट्रीयत्व नाही असं म्हणताना त्याला विशिष्ट बंधन येते. यात सत्यांश नाहीच असे माझे मुळीच म्हणणे नाही. परन्तु देशद्रोहीपणा हा व्यक्तिगत असतो. नन्तर तो सामुदायिक होऊही शकतो. पण प्रथम तो व्यक्तिगत असतो. अन् आज ५० कोटीच्यावर जनसमुदाय देशात असताना जेव्हा व्यक्तिगत गुन्हेगार (देशद्रोही) एकदम आढळू शकत नाहीत तेव्हा निष्क्रीयतेने एकाद्या विशिष्ट समाजावर खापर फोडण्यात येते. जसे मुसलमान देशद्रोही आहेत तसे भाव वाढवणारे, युद्धकाळी स्वतःच्या तुमड्या भरणारे, स्वतःचा प्रदेश परकीयाना देऊन टाकणारे असे कित्येक हिन्दूही देशद्रोहीच नाहीत का? अन आजकाल वाईट काय आहे ते प्रत्येकजण सांगतोय. पण एकाही जवळ ते सुधारण्याचे प्रभावी मार्ग नाहीत.

तसेच श्री. साठे यांनी 'जनसंघ फूसका ठरला' अशी जी टीका केली आहे ती करताना कुठलाही दूरदर्शी व सखोल विचार केलेला नाही. याचा अर्थ असा मुळीच नव्हे की जनसंघ ह्या विशिष्ट राजकीय पक्षाची मी वकिली करीत आहे. साठ्यांना अद्याप निरनिराळ्या पक्षातील धोरणांचे भिन्नत्व राजकीय पातळीवरून काय आहे हे लक्षात आलेले नाही. इतका आततायीपणा देशाचे राज्य चालविताना चालत नसतो हा अगदी साधा Common Sense आहे. ह्याबद्दल मी त्यांना मुळीच दोष देत नाही. स्वतंत्र राज्यातील एक जबाबदार नागरिक म्हणून ते शोभतात.

राज्यकर्त्यांना देशबुडवे, बांडगुळे म्हणण्यात काहीच अर्थ नाही. कारण ते जनतेचे प्रतिनिधी म्हणून आज वावरत आहेत. ते जे राजकारण खेळतात त्यांत बरेचसे त्यांच्या वैयक्तिकच दोषांचे प्रतिबिंब असते. तेव्हा त्यांना त्या पदापर्यंत जाऊ देणे, न देणे हे जनतेने ठरवावयास हवे. जनतेत तेवढी जागृती हवी.

हिन्दूनाच फक्त मताधिकार हा शुद्ध पोरकटपणा आहे. ह्यामुळे देशाचे स्वातंत्र्यच अत्यंत अशाश्वत ठरेल. हिन्दूंचे वर्चस्व हिन्दूंनीच सिद्ध करून दाखवावे पण वैधमार्गाने !

येऊन जाऊन एक संतती नियमनाचीच बाब ! हिन्दूंनी ते करू नये ! बस ! प्रश्न मिटला. जेव्हा पाच अन्य जातीय करतील तेव्हा पाच हिन्दू करतील असे उघडपणे व बेडरपणे सरकारला कळवावे एकपत्नी कायदा जसा हिन्दूंना लागू आहे तसा मुसलमानानाही करावाच. नाहीतर तो हिन्दूंनी अजीबात पाळू नये. तेवढी संघटित शक्ती दाखवावी. असो.

ह्या विषयी जाणकार व थोरानीच जास्त मार्गदर्शन करावे ! कळावे.

आपला,

अहमदनगर —मुकुल दिवाडकर

## परिणामकारक व यथार्थ

सन. न. वि. वि.

आपले दीपावलीचे (गणराज्य विशेषांक) संपादकीय वाचले. वाचून आनंद झाला.

प्रत्येक शब्दागणिक आपली कळकळ व भावनेचा आवेग ह्याचा प्रत्यय येतो. विचारी देशनिष्ठ व स्वाभिमानी वाचकास विचार करावयास लावील असे ओज व सामर्थ्य त्यात आहे. सद्य परिस्थितीचे आपण रेखाटलेले शब्दचित्र वास्तव, म्हणूनच परिणामकारक व यथार्थ.

भाषेच्या व प्रांताच्या कैफामुळे लोक आंधळे झाले आहेत. या संकुचित प्रकृतीना वेळेवर काबूत न ठेवल्यास देशाचे भवितव्य धोक्यात आहे. ह्याची जाणीव, बोच सुविचारी वाचकांस आपल्या ह्या तळमळीच्या संपादकीयाने होवो ही प्रार्थना. कळावे.

गिरगाव, मुंबई ४ — आपला, मामासाहेब भट





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## एक प्रदीर्घ (अ) प्रीतिकथा



# अतृप्ता

—श्रीधर घैसास

**संध्याकाळी** पाच वाजता फोन खणखणला आणि मी जरासा **चिडूनच** आता हा कोणाचा असं फुटफुटत रिसीव्हर उचलावा **की नाही** याचा क्षणभर विचार करीत राहिलो! शेवटी नाईला-जानं का होईना पण रिसीव्हर उचलावाच लागला आणि **"हॅलो, मी बोलतेय"** म्हणून तिकडच्या बाजूनं हेमलचा आवाज ऐकू आला.

जराशा नाखुशीनंच मी 'त्या' हॅलोची परतफेड केली. परंतु **मला पुढे** काहीही बोलू न देता तिनं फक्त ती आणि अजय **माझ्याकडे** अत्यंत जरुरीच्या कामासाठी येत आहेत असं अगदी **गंभीर** आवाजात सांगितलं आणि मी कुठेही न जाता त्यांची वाट पाहात ऑफिसमध्येच थांबावं असं बजावून तिनं फोन खाली ठेवला. म्हणजे आता नाही म्हणण्याचा प्रश्नच नव्हता.

खरं तर आज खूप उशीरापर्यंत बसून हातातील डिझाईन पुरं करावयाचं असं मी मनाशी ठरविलं होतं. हे डिझाईन दुसऱ्या दिवशी सकाळी ब्लॉकला पाठविणे अत्यंत जरुरीचे होते. पण एखादा दिवसच असा उगवतो की काम पुरेच होऊ शकत नाही. मधे मधे दुसरेच काही तरी काम निघत राहाते आणि हातातले काम बाजूलाच पडते. डिझाईनिंगबरोबरच आमच्या ॲडव्हर्टाय-झिंग एजन्सीच्या डिझाइन्समध्ये लागणाऱ्या "मॉडेलिंग"चे लचांडही माझ्यामागे लागलेले आहे. त्यामुळे अर्जंट काम करीत असलो तरीही आधीच्या डिझाइनसाठी मॉडेल म्हणून वापरलेल्या







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

मॉडेलचा फोन येतो. "फोटो चांगला आला आहे का? चांगला असला तर अॅप्रुव्ह झाला का?" किंवा असाच दुसऱ्या कुठल्या तरी मॉडेलचा–"पैसे केव्हा देता" याची चौकशी करण्यासाठी म्हणून फोन येत राहातो. थोडक्यात म्हणजे ह्या पोरींचे फोटो काढल्यापासून तो ते छापले जाऊन त्यांना पैसे देईपर्यंत हे फोन कायम वाजत असतात–अर्थातच काही अपवाद सोडून! तोपर्यंत नवीन डिझाइन्स तयार होत असतात आणि नवीन मॉडेल्स त्यासाठी घ्यावयाची असतातच. तेव्हा हे राहाटगाडगे असेच चालू असते. कामाची गर्दी असतानाही! आणि काम थांबवून त्यांना तोंड देणे हा सुद्धा एक नित्याचाच भाग असतो!

त्या दिवशी तर या फोननी कहरच केला होता. माझा बहुतेक वेळ असाच फुकट गेला होता व म्हणूनच संध्याकाळी कितीही उशीर झाला तरी डिझाईन पुरे करावयाचेच हा निश्चय मी मनाशी केला होता. पण हेमलच्या ह्या फोननं माझ्या बेतावर साफ बोळा फिरविला. इतर कुणालाही मी कामाच्या सबबीपुढे वाटेला लावले असते. पण हेमलच्या बाबतीत ते शक्य नव्हते. म्हणूनच मी मुकाटयानं सर्व सामान आवरू लागलो. मात्र मनात सारखे तिच्याबद्दलच विचार सुरू होते.....ती दोघंही

**अरेच्या! ही तर ब्रिगेडियर सबनीसांची हेमल!! सुंदर, सुशिक्षित, विलायतेहून परतलेलं झक्क मॉडेल. पण अजयबरोबरच्या लफड्यात आम्ही तिला नांव ठेवलं आहे अतृप्ता. तुम्ही काय ठेवाल अं!**

येणार होती—आज दोघानाही एकाच वेळेला माझी आठवण झाली होती म्हणजे निश्चितच काही तरी घडले होते. परंतु काहीही घडलं असलं तरी मला थांबणं भागचं होतं.

आयुष्यात योगायोगानं आपल्याला एखादी व्यक्ती भेटते. सहजगत्या दोघांचेही स्वभाव एकमेकाशी जुळून जातात. आणि त्या 'नुसत्या' ओळखीचं पुढे 'निकट' मैत्रीत रुपांतर होतं–काहीही प्रयत्न न करता! हेमलच्या बाबतीत माझं अगदी असंच घडलं होतं. तिचा मोकळा, फटकळ आणि मिष्कील स्वभावही कदाचित याला कारणीभूत असेल. पण हे झालं होतं नक्कीच! कुठल्या तरी पार्टीला मी गेलो होतो तिथेच तीही आली होती. आमच्या यजमानीणबाईनीच तिची माझ्याशी ओळख करून दिली आणि हंसत हंसतच....

"पहा तुम्हांला कुठे मॉडेल म्हणून एखाद्या जाहीरातीत ढकलता आली तर द्या ढकलून" असं जाता जाता सहज सुचविलं. यावर मी नुसताच हंसलो होतो–चेहेऱ्यावर काहीही भाव न दर्शविता. मात्र त्यांनी सांगण्यापूर्वी तिला पाहाताच माझ्या मनात हाच विचार आला होता. तिची प्रमाणबद्ध शरीरयष्टी, मोहक आणि बोलका चेहेरा व प्रथमदर्शनीच आकर्षित करणारं लाघवी हास्य पाहाताक्षणी हिचा फोटो नक्कीच कुठल्या तरी जाहीरातीसाठी घ्यावयाचा हे मी त्या क्षणालाच ठरवून टाकलं होतं.

"खरंच जमेल का हो मला मॉडेलिंग?" थोडा वेळ दुसऱ्या कसल्या तरी विषयावर आमचं बोलणं झालं आणि एकदम तिनं, मी अपेक्षिलेला प्रश्न केला. तिच्या मनात हाच विषय घोळत असावा.

"तुमची खरोखरच इच्छा असली तर मला वाटतं मी नक्कीच जमवून देईन......मात्र त्यासाठी आधी ट्रायल फोटो घ्यावे लागतील. ते अॅप्रुव्हलसाठी Client कडे पाठवावे लागतील. Client नं ते फोटो म्हणजेच मॉडेल अॅप्रुव्ह केलं की जाहीरातीयोग्य असे फोटो परत काढावे लागतील–आम्हाला हवे असतात तसे–तुमची हरकत नसेल तर येत्या गुरुवारी बरोबर तीन वाजता माझ्या ऑफिसमध्ये या. त्यावेळेला मी ट्रायल फोटो घेऊ शकेन." खिशातून माझे कार्ड काढून मी तिला देत म्हणालो. आणि तिचे 'थँक्स' स्वीकारण्यापूर्वीच पुढे सरकलो. माझ्या इतर मित्रमंडळींना भेटण्यासाठी. मग मात्र मी संपूर्णपणे पार्टीत मिसळलो. परंतु निघताना मी दिलेल्या अॅपॉइंटमेंटची आठवण करून देण्यास ती विसरली नाही.

ठरल्याप्रमाणे ती गुरुवारी दुपारी आली आणि मी तिचे फोटो घेतले. आणि प्रिंट्स पाहिल्यावर खरं म्हणाल तर मीच अधिक खूष होऊन गेलो. अत्यंत "फोटोजेनिक" हा एकच शब्द तिच्याबाबतीत योग्य होता. कोणत्याही अँगलमध्ये तिचा चेहेरा आणि बांधा अतिशय आकर्षक दिसत होता. ह्याचा अर्थ कुठल्याही प्रॉडक्टसाठी कोणत्याही जाहीरातीत ही यशस्वी ठरली असती. माझ्या हातात अचानक हुकुमाचे पान आले होते, आणि म्हणूनच मी इतका खूष झालो होतो.

दुसऱ्याच दिवशी मी तिचे फोटो नवीन जाहीरातीत वापरता यावेत म्हणून अॅप्रुव्हलसाठी पाठवून दिले. ते पाहाताच Client चा म्हणजेच अजयचा–त्या कंपनीच्या मॅनेजिंग डिरेक्टरचा मला फोन आला. मॉडेल त्याला एकदम पसंत पडले होते आणि हिचा फोटो यापूर्वीच कां वापरला नाही म्हणून तो मलाच उलटा जाब विचारीत होता!

ही नवी जाहीरात लवकरात लवकर छापण्यास त्याने बजावले होते व म्हणूनच मीही अजयच्या हुकुमाची तातडीने अंमलबजावणी करण्याचे ठरविले. अजयची आणि माझी अनेक वर्षांची मैत्री आणि म्हणूनच मित्र आणि Client ह्या दोन्ही नात्यानी त्याला खूष ठेवणे भाग होते. लगेच हेमलला फोन करून मी तिची अॅपॉइंटमेंट ठरविली. जाहीरात साडीची असल्यामुळे ती अजयच आणणार होता. परंतु केशरचना वगैरे गोष्टीबाबत मी तिला सूचना दिल्या आणि अजयच्या इच्छेप्रमाणे त्यालाही बोलविले.

आणि मला वाटतं इथेच नाटकातील नवा प्रवेश सुरू झाला. मी दिलेल्या वेळेप्रमाणं दोघंही हजर झाली. रीतीप्रमाणे मी तिची "हे श्री. अजय आपटे – अजय फेब्रिक्सचे



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पार्टनर असि. मॅनेजिंग डिरेक्टर म्हणून ओळख करून दिली. तिला अजयनं पाहिलं मात्र, तिच्या मोहक आणि जीवघेण्या हास्यानं तो पहिल्याच फटक्यात घायाळ झाला. नजरेच्या पहिल्या फेकीतच तिनं त्याला बाद केलं होतं. ह्या नजरबंदीच्या खेळात, अजयला इतक्या सहजासहजी चीत झालेला मी प्रथमच पाहात होतो. वास्तविक अजय म्हणजे कुठल्याही सुंदर तरुणीच्या शिकारीला सहजी बळी पडणारं बेसावध सावज नक्कीच नव्हतं! अनेक सुंदर तरुणींचा सहवास लाभून देखील आपल्या हृदयाचा पत्ता त्यानं कुणालाही लागू दिला नव्हता. आणि म्हणूनच अजयसारखा तरुण परंतु अनुभवी माणूस इतका सहजगत्या आणि तो सुद्धा पहिल्या भेटीतच घायाळ झालेला पाहून तिच्या या कलेचं मी मनापासून कौतुक करीत होतो.

"वरं हेमल, तू काय घेणार? गरम की थंड?" काम सुरू करण्यापूर्वी हे शिष्टाचार मी आधी उरकतो. नाहीतर कॅमेऱ्यासमोर बाई उभी राहिली तिला तहान लागल्याची आठवण होते आणि पुन्हा सर्व खोळंबा होतो.....ड्रींक्स घेतल्यावर ताबडतोब कपडे बदलण्यासाठी मी तिला ग्रीनरूममध्ये पाठविले. आणि थट्टेनं पाठमोऱ्या असलेल्या अजयच्या पाठीवर थाप मारली.

"क्यों भाईसाब? क्या सोच रहे थे?" मी त्याला विचारलं.

"परी–अस्मानकी परी" अजय वर पाहात नशेत असल्यासारखा पुटपुटला. "कुठे लेका गाठलीस हिला?"

"गाठली नाही. गाठ पडली. नशीबाचा भाग असतो एकेकाच्या ....ते काय चुकतंय? मी नाही म्हटलं तरी...?" मी विरक्तीचा आव आणून म्हणालो.

तिचं नशीव थोर म्हणून आज माझ्याशी तिची ओळख झाली. नाहीतर तुझ्यासारख्याशी गाठ पडल्याबद्दल मागाहून ती आपल्याच नशीबाला दोष देत राहिली असती." अजय चेहेऱ्यावर सात्विक भाव आणीत म्हणाला.

"छान! तुम्ही आम्हाला सभ्य म्हणून जगू देऊ नका! माझ्या पोटापाण्याचा प्रश्न आहे इथं! तेव्हा ह्या व्यवसायात मला नेकीनंच राहायला हवं. थोडक्यात म्हणजे डॉक्टर आपल्या स्त्री-पेशंटशी ज्या नेकीनं राहातो तसाच. म्हणूनच कुठल्याही पोरीला माझ्याशी गाठ पडली तरी पश्चात्ताप करावा लागणार नाही याची मी नेहमीच काळजी घेतो." तुला पोटापाण्याची काळजी नाहीच! म्हणून तुला हे नियमही लागू नाहीत... चेहऱ्यावर शक्य तितके गांभीर्य आणत मी म्हणालो.

"हे बघ वहिनींच्या समोर उच्चारायची वाक्यं माझ्यासमोर बोलून काय फायदा?" अजयनं शांतपणे हसत मला प्रश्न केला.

आम्ही दोघंही हसलो यावर.....

"तू काहीही म्हण, पण हिच्यात काहीतरी विशेष आहे—काही तरी वेगळं आहे हे नक्की. काय ते मीही सांगू शकत नाही. पण हे काम इतराहून निश्चितपणे निराळं आहे असं मला वाटू लागलं आहे." अजयनं मोकळेपणानं कबुली दिली.

"ते मी मघाशीच ओळखलंय साहेब, आपली ओळख करून दिली तेव्हाच!" मी म्हणालो. यावर अजय नुसताच वर पाहात राहिला. अगदी झपाटल्यासारखा एकाग्र चित्तानं...एकूण अजयनं खरोखरच मनावर घेतल्याचं दिसत होतं.

कपडे बदलून आणि परत एकदा मेकअपचा हात फिरवून ती जेव्हा बाहेर आली तेव्हा तर पूर्वीपेक्षाही अधिक टवटवीत दिसत होती. पुन्हा एकदा प्रसन्न हास्याची फेर झडली. अर्थातच अजयकडे पाहात.... "Oh simply charming" अजयच्या तोंडून उत्स्फूर्त उद्गार बाहेर पडले.

"चलो" मी हुकूम सोडला आणि लाईट्स ॲडजेस्ट करू लागलो.

"अजय, आता कशा पोझेस पाहिजेत ते ठरवू. मी अजयला म्हणालो. अजयनेही तिला सूचना दिल्या.

आणि हेमल, चेहेऱ्यावर तुझं नेहमीचं मोहक हास्य.... आणि त्यावरोबरच "Appreciation" चा भाव येऊ दे. मी भराभर क्लीक् करतो. फोकस् बरोबर करीत मी स्टार्ट म्हणूनच ओरडलो.

आणि तिनं ॲक्शन घेण्यास सुरवात केली—एखाद्या अनुभवी मॉडेलप्रमाणं! मुळीच कॉन्शस न होता. मलाही या गोष्टीचं कौतुक वाटलं. थोड्याच वेळात मी दोन रोल संपविले व थँक्स म्हणून लाईट्स ऑफ केले. चांगल्या पोझेस मिळाल्यामुळे अजयचंही समाधान झालेलं दिसत होतं. आणि म्हणूनच फोटोच्या फायनल ॲप्रुव्हलबद्दल मला मुळीच काळजी वाटत नव्हती. एन्लार्जमेंट्स लवकरात लवकर पाठविण्याचं आश्वासन देऊन मी दुसऱ्या कामाला लागलो. अजयनं अर्थातच तिला घरापर्यंत लिफ्ट दिली हे वेगळं सांगावयास नकोच.

जवळ जवळ पंधरा दिवसानी हेमलचा फोटो असलेली ही

आता टोपी कोणाला?



शेख अब्दुल्लांच्या काश्मीरमधल्या भाषणांनी अनेक लोक 'कंप्लीट फूल' झाले.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

जाहीरात तयार होऊन छापली गेली आणि मी अपेक्षिल्याप्रमाणे माझ्या इतर काही Clients चे "हे नवीन मॉडेल कोण" म्हणून चौकशीसाठी फोन आले. तेव्हा अजयला चिडविण्यासाठी मी उगीचच त्याला फोन केला.

"तुझ्या या मॉडेलवर माझ्या इतर Clients ची नजर पडली आहे. त्यानाही आता हीच हवी आहे त्यांच्या प्रॉडक्टसाठी ...तुझी काही हरकत?" मी विचारलं.

"ऑफ कोर्स....हरकत आहे याबद्दल वादच नाही. माझ्या इतर ज्या काही कंपन्या आहेत, त्यांच्या प्रॉडक्टसाठी म्हणजे डोमेस्टिक ॲप्लायन्सेसपासून तो टिनफूडपर्यंत सर्व काही त्यात आले–मी हिलाच वापरणार आहे. तेव्हा यापुढे ती दुसऱ्या कोणा-साठीही मॉडेलिंग करणार नाही याची मी तजवीज करून ठेवली आहे. तुझ्या इतर Clients ना आता ती "नॉट अॅव्हेलेबल" म्हणून खुशाल सांगून टाक." अजयनं स्पष्ट शब्दात सांगितलं.

"अरे पण ती तयार होईल का या तुझ्या एकतर्फी बंधनात अडकून राहायला? समज तिला दुसऱ्या कोणी अधिक पैसे दिले तर?" मी विचारलं.

"हं....याचा बंदोवस्त मी कधीच करून टाकला आहे. तुला काय वाटलं मी फालतू वडवडतोय? तिला तुझ्याकडून घरी सोडली ती दुसऱ्या दिवशीची ॲपॉइंटमेंट देऊनच! त्याच वेळेला माझ्या डोक्यात विचार चालले होते की आपल्या इतर प्रॉडक्ट-साठी हिला का वापरू नये मॉडेल म्हणून? म्हणजे ही सतत सहवासात आणि शिवाय डोळ्यासमोरही राहील. नुसता विचार आला मात्र, ताबडतोब तिच्याशी करार करण्याचं ठरवून टाकलं. ती म्हणत होती की तुला विचारून मग काय ते ठरवते. म्हणून... पण मी तिला तू माझ्या शब्दाबाहेर नाहीस असं सांगून परस्परच करार केला. त्यासाठी तिला पैसेही भरपूर देऊ केले."

म्हणजे तिला अडकविण्याऐवजी तू स्वतःच अडकत चाललेला दिसतोयस. ती कोण, कुठली काही विचारपूस केलीस? तिच्याबद्दलची काही माहिती काढलीस? की एखाद्या कॉलेज कुमारासारखाच प्रेमात पडण्याचा विचार आहे तिच्या? म्हणे सतत डोळ्यासमोर राहील! आयुष्यात पहिलीच मुलगी भेटल्यासारखं बोलतोयस! आणि सर्व प्रॉडक्टसाठी एकच मॉडेल वापरण्याचा हा तुझा करार मला वाटतं "शुद्ध चमत्कारिकपणा" या सदरातच मोडेल. हिला एकदम एवढा भाव देतोयस पण ती त्याला लायक आहे की नाही हे आधी ठरव बुवा. तिच्या नुसत्या रुपावर जाऊ नकोस. जर प्रेमात खरोखरच पडणार असलास तर त्या आधी तिचा खरा स्वभाव आणि संपूर्ण माहिती जमव बाबा! तुझ्यासारख्या बड्या व्यक्तीला शोभणारं हे काम असेल तरच याबाबतीत पाऊल





–तीं साध्य करण्यासाठीं कष्ट व बचत यांची जोड लागते.

निरनिराळ्या जाहिरातींमधील जीवनोपयोगी वस्तूंची अभिलाषा धरून आपलें जीवन सुखमय करण्याची अपेक्षा बाळगणाऱ्या ह्या जोडप्यास कोण दोष देईल? पण नुसती इच्छा बाळगून फळ पदरांत कसें पडणार?
पुष्कळशा आवश्यक वस्तूंच्या किंमती साधारण माणसाच्या आवाक्याबाहेरच्या आहेत. पैसे वांचवूनच अशा वस्तू विकत घेतां येतील.
बचत योजनापूर्वक केली पाहिजे. खर्च करण्यापूर्वीच तुमच्या मिळकतींतून ठराविक रक्कम शिल्लक टाकली नाहींत तर कदाचित् सर्व पैसे खर्च होतील.

दी बँक ऑफ इंडिया लि.

टी. डी. कंसारा, चेअरमन






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

उचल. मी प्रामाणिकपणे सांगितलं.

"तुला ऐकायचंय ? मग सांगतोच आता–तिला घरी पोचवताना हळूहळू तिची माहिती मी काढून घेतली. ब्रिगेडियर सबनिसांची ही मुलगी. बाप रिटायर्ड......घरचे सर्व उत्तम. कुळशील वगैरे म्हणशील तर एकदम नंबरी. वडिलांना भेटण्याचा योग दोनतीन वेळा आला. म्हातारा खूप मोकळा आहे. घरी दुसरं कोणीही नाही. ही डबल ग्रॅज्युएट असून फॉरेनची हवा चाखून आलेली आहे आणि सगळ्यात महत्वाची गोष्ट म्हणजे, अजून कुठल्याही तऱ्हेनं मी तिला– 'तू मला खरोखरच आवडतेस, किंवा मी तुझ्या प्रेमात गळ्यापर्यंत बुडालो आहे' अशा तऱ्हेचं काहीच भासविण्याचा प्रयत्न सुद्धा केला नाही."

तिचा मात्र रोज फोन येतो. कधी कधी ती ऑफिसात येते. आम्ही कुठं तरी फिरायलाही जातो. आणि हे सर्व या पंधरावीस दिवसात घडलं आहे. तिच्या मनातील भावना नक्की कळल्याशिवाय मी चुकूनही माझं मन उघडं करणार नाही. तेव्हा, मी वहावलो आहे किंवा तिच्यासाठी पागल झालो आहे असा गैरसमज उगाचच करून घेऊ नकोस. मी इतका खुळा नाही राजा !

"आता कोण कुणाला खुळं बनवतं तेच पाहायचं. मी म्हटलं. एकंदरीत तू भलताच फास्ट आहेस. तुझं खरंच कौतुक केलं पाहिजे. पंधरा दिवसात जर एवढी प्रगती तर पुढील महिन्या दोन महिन्यात तू कुठे पोचशील ? काही तरी करून आम्हाला निस्तरायला सांगू नका म्हणजे झालं ! बराय....anyway, wish you all the luck" असं म्हणून मी हसतच फोन ठेवला.

आणि यानंतर अजयनं ठरविल्याप्रमाणे हेमल त्याच्या प्रत्येक प्रॉडक्टच्या जाहिरातीत झळकू लागली. कधी साड्यांच्या शो–कार्डसाठी तर कधी अजय पॉटरीज्च्या जाहीरातीत सुंदर गृहिणीच्या वेषात, कधी त्याच्याच भागीदारीत असलेल्या रेडिओ कंपनीच्या पोस्टर्समध्ये तर कधी त्याच्या–जॅम्स, स्क्वाशेस आणि पिकल्स वगैरे बनविणाऱ्या कंपनीच्या Window Display मध्ये एकंदरीत मॉडेल म्हणून हेमल जोरात वाटचाल करीत होती आणि त्याबरोबरच अजयची प्रगतीही चालू होती.



हेचि काय फल मम तपाला !

साधारणपणे आठ एक दिवसानी हेमल किंवा अजय माझ्याकडे चक्कर टाकीत. मग कुठेतरी बाहेरच चहापाण्याचा कार्यक्रम होई. दोघाचीही मी मनमुराद थट्टा करीत होतो. परंतु मी त्यांना लग्नाबद्दल कधीही विचारले नाही. त्यांच्या बद्दल आमच्या मित्रमंडळीनी उठविलेल्या वातम्या माझ्या कानावर येतच होत्या. त्यावरूनच साधारणपणे मी आडाखे बांधीत होतो. परंतु त्यांनी आपणहून सांगेपर्यंत ह्या बाबतीत त्यांना काही विचारायचं नाही हे मी ठरवून टाकलं होतं. एक गोष्ट मात्र निर्विवाद होती की दोघानाही एकमेकाशिवाय चैन पडेनासं झालं होतं.

अजयकडून प्रेझेंट्सची खैरात चालूच होती. व तीही लग्नाच्या बायकोसारखी आपल्याला आवडलेली एखादी गोष्ट हक्कानं मागून घेत होती. एकंदरीत दोघंही सुखात होती. ह्यामध्ये सहासात महिने कसे भराभर निघून गेले.

कोणत्याही समारंभात, सिनेमाला, क्लबमध्ये किंवा डिनर पार्टीला, मी एकट्या अजयला किंवा तिला एकटीला कधीच पाहिलं नाही. नवराबायकोप्रमाणं ती जोडीनं दिसत. एकंदरीत इतर प्रेमप्रकरणाप्रमाणे याचाही शेवट लग्नातच होणार हे उघड होतं. हेमलनं जोडीदार निवडण्यात खरोखरच औचित्य साधलं होतं. माझ्या मते ती खरोखरच नशीबवान ठरली होती.

असाच एकदा हेमलचा फोन आला. त्यांचे ऊटकमंडला जाण्याचे ठरले होते. आठएक दिवस.

काय ग मुंबईतली सगळी प्रेक्षणीय स्थळं संपली ? मी हसतच विचारलं. आणि शिवाय "लग्नाच्या आधी मधुचंद्र" आपल्या संस्कृतीत बसत नाही. एक तर आधी लग्न करून टाका, नाहीतर तुमच्यावर लक्ष ठेवण्यासाठी मला तरी बरोबर न्या....त्यासाठी मी अवश्य वेळ काढीन !

फाजीलपणा करू नकोस. फक्त येताना तुला 'काय' वस्तू आणू हे विचारण्यासाठी मी तुला फोन केलाय. हेमलनं बजावलं.

तुम्ही घोटाळा न करता दोघंही सुखरूप या म्हणजे मला सगळं मिळालं....मी हसून म्हणालो आणि फोन खाली ठेवला.

आणि ठरल्याप्रमाणं ती दोघंही उटीला गेली. मी सुद्धा त्यानंतर बऱ्याच कामात अडकल्यामुळे मलाही जवळजवळ पंधरावीस दिवस त्यांच्याकडे फिरकता आले नाही. त्यांच्यापैकीही कुणाचा फोन आला नाही किंवा माझ्याकडेही कोणी फिरकले नाही.

**[ ह्या कथेचा उत्कंठा वाढविणारा उत्तरार्ध पुढील अंकी ]**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# एकी हेच बळ होय

प्रजासत्ताक दिन आला आणि गेला.
त्या महत्वाच्या महोत्सवाची स्मृती एकीकडे आपल्या मनांत तरळत
असताना आपण लक्षात ठेविले पाहिजे की एकीतच बळ असते
आणि एकीतूनच आपण आपले शांततेचे व उन्नतीचे ध्येय
साध्य करू शकू. आपल्या मातृभूमीबद्दलचा आपला
अभिमान व निष्ठा पक्क्या करून आपण सर्वांनी
ज्याच्यासाठी निर्धाराने झटावयाचे ते कार्य म्हणजे.

**एक महान देश, एक महान जनता**






davp 67/449







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

विख्यात क्रिकेटपटू

# कै. लक्ष्मीदास जाय

तीस वर्षांपूर्वी प्रथम श्रेणीच्या क्रिकेट सामन्यातून निवृत्त झालेल्या व त्यापूर्वी आपल्या दणकेबाज, आक्रमक नि आकर्षक फलंदाजीने मुंबईतील चौरंगी सामन्यात व क्रिकेटच्या खेळात नावलौकीक कमावलेल्या या खेळाडूचे निधन दि. २९ जानेवारी १९६८ रोजी झाले. या निमित्ताने त्यांच्या फलंदाजीसंबंधी व चौरंगी सामन्यांच्या त्या काळच्या परिस्थितीची माहिती देणारा हा लेख....



"१९२८ साली प्रख्यात फलंदाज व क्रिकेट खेळाडू श्री. दुलिपसिंग प्रथमच मुंबईस चौरंगी सामन्यात हिंदु संघातून खेळले. त्यात त्यांनी ८४ धावा काढल्या. श्री. जायने ७६ व प्रो. देवधरांनी ८३ धावा काढल्या होत्या. हिंदु जिमखान्यातील एका प्रमुख व्यक्तीने त्यांच्या उत्कृष्ट खेळाबद्दल त्यांचे अभिनंदन केले आणि आपण जर ही त्यांची त्या दिवशीची फलंदाजी पाहिली नसती तर आयुष्यातील क्रिकेटच्या एका महत्वाच्या घटनेला पारखे झालो असतो असा उल्लेख केला. त्यावर लगेच श्री. दुलिपसिंगानी टोमणा दिला. ते म्हणाले, "आपण चूक करता असे मला वाटते. श्री. जाय व प्रो. देवधरांची त्या दिवशीची फलंदाजी जर तुम्ही पाहिली नसती तर मी पाहिलेल्या उत्कृष्ट फलंदाजीला आपण खात्रीने मुकला असता." श्री. विजय मर्चन्ट यांनी ही आठवण प्रसिद्ध केली आहे. या त्यांच्या उद्गारावरून श्री. दुलिपसिंगच्या उमद्या स्वभावाची जितकी पारख होते तितकीच श्री. जायच्या व देवधरांच्या १९२८ सालच्या खेळातील प्राविण्याबद्दल त्यांचा अभिप्रायहि समजून येतो.

श्री. जायने १९२० साली चौरंगी सामन्यात वयाच्या १८ व्या वर्षी पदार्पण केले. त्यापूर्वी शालेय व कॉलेजातील क्रिकेटच्या क्षेत्रात त्यानी नांव मिळविले होते. एलफिन्स्टन हायस्कूलमध्ये असताना त्यांना त्या शाळेचे क्रिकेटचे शिक्षक व जुने पारशी क्रिकेटपटू श्री. नागपूरवाला यांजकडून शिक्षण मिळाले. मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर ते विल्सन कॉलेजमधून खेळले व तेथेही ते चांगलेच चमकले. चौरंगी सामन्यात खेळणे हे त्या वेळच्या सर्व क्रिकेट खेळाडूंचे ध्येय असे व त्यांनी ते ध्येय शालेय जीवनापासून आपल्या समोर ठेवले होते व त्या दृष्टीने प्रयत्न चालू होता. शाळेत असतानाच चौरंगी सामन्यात खेळण्याचा मान श्री. करंजिया नावाच्या भर्डा न्यू हायस्कूलमधील विद्यार्थ्यास मिळाला होता. पण हिंदु संघात समावेश करून घेणे त्यावेळी फार कठीण होते; पण लवकरच कॉलेजमध्ये असताना त्यांना हा मान मिळाला.

**क्रिकेटमधील कामगिरी**

चौरंगी सामन्यात पदार्पण केले ते ५६ धावा काढून. त्यानंतर अठरा वर्षे त्यानी या सामन्यात व इतर पहिल्या दर्जाच्या सामन्यात आपली कारकीर्द चांगलीच गाजविली. १९२४–२५ ही दोन वर्षे त्यांच्या कारकिर्दीतील अतिशय यशवंत वर्षे होती. त्या काळात मुसलमान संघाविरुद्ध १५६ धावा काढल्या. पारशी संघाविरुद्ध १०४ व युरोपियन्स विरुद्ध पहिल्या डावात ८० धावा व दुसऱ्या डावात ७१ धावा काढल्या.

या सामन्यातील त्यांच्या खेळाची तारीफ श्री. पी. विठ्ठल (या सामन्यातील हिंदु संघाचे कर्णधार) यानी पुढील शब्दात केली आहे, "त्यांच्या बॅटिंगमधील विशेष म्हणजे त्यांचा बॅक खेळ चांगला असून लेगच्या बाजूस खेळण्याची शैली तर अप्रतिम आहे. प्रेक्षकांच्या दृष्टीने श्री. जाय यांचा खेळ अतिशय मनोवधक असतो व




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



एल. पी. जाय (डावीकडून पांचवे) समकालीन महान क्रिकेटपटूंच्या सान्निध्यात

त्यांच्या नैपुण्याबद्दल कौतुकाने काही लोक "दुसरे रणजी" म्हणतात हे काही अगदी वावगे नाही. श्री. जाय यांच्या एकंदर तयारीवरून पुढे मागे हे मोठे नांव करतील व सुप्रसिद्ध इंग्रज खेळाडू हॉब्स यांच्या प्रमाणे नमुनेदार कृती करतील असा मला भरवसा वाटतो. श्री. जाय हे धनाढ्य गुजराथी जातीचे आहेत. त्यांच्या ज्ञातिबांधवानी हौसेने फंड जमवून त्यांना विलायतेस पाठविले तर व्यापार आणि उद्योगधंदा शिकून सुप्रसिद्ध हिंदु खेळाडू "प्रिन्स रणजी" यांच्याप्रमाणे कीर्ति संपादल्याशिवाय ते राहाणार नाहीत. १९२८ साली चौरंगी सामन्यात (ज्या प्रसंगाबद्दल सुरवातीस सांगण्यात आले आहे) श्री. दुलिपसिंगाबरोबर खेळण्याचा श्री. जाय यांना योग आला. त्या खेळाचे वर्णन त्यावेळच्या एका प्रख्यात लेखकाने पुढीलप्रमाणे केले आहे, "पहिल्या डावात ते व दुलीप जोडीने खेळत होते; पण दोघात उजवा कोण व डावा कोण हे चटकन् सांगवणार नाही असा जाय यांचा खेळ झाला. त्यांचे ड्राईव्ह दुलीपच्या तोडीचे वाटत होते आणि बोलिंग फोडण्याचा आत्मविश्वास दुलीप इतकाच त्याच्याही फटक्यात स्पष्ट दिसत होता." (रत्नाकर १९२८).

चौरंगी सामन्यात एक हजारावर (१०४६) धावा काढणारे पांच फलंदाज असून त्यापैकी हिंदु फलंदाज श्री. नायडू, देवधर, विठ्ठल, जाय हे होत व पाचवी जागा पारशी खेळाडू होमी वजिफदार यांनी मिळविलेली आहे. पंचरंगी सामने झाले त्यावेळी १९३८ साली त्यानी शतक झळकाविले व १९३६ मध्ये ऑस्ट्रेलियन (रायडर नेतृत्व) संघाविरुद्ध मुंबई प्रेसिडेन्सी तर्फे ११५ धावा काढल्या. मुंबईतील हिंदु जिमखान्यातर्फे झालेल्या इतर सामन्यात त्यांनी आपल्या कारकिर्दीत एकंदर १६ हजार धावा काढल्या आहेत. सुरवातीस ते उत्तम क्षेत्ररक्षक गणले गेले होते व धावण्यात फार चपळ होते. पण पुढे पुढे शरीराचा आकार वाढू लागला व त्यांच्या कडून क्षेत्ररक्षण नीट होईना. त्यांचा उत्साह मात्र दांडगा होता पण

## दि. वि. आमोणकर

शरीराचा आकार क्षेत्ररक्षणाच्या आड येत होता. आपल्या कारकिर्दीच्या शेवटच्या दोन वर्षात "हिंदु संघाचे" नेतृत्व करण्याचा त्याना मान मिळाला व आपल्या अंगच्या गुणानी त्यांनी संघनेता म्हणूनही बरेच नांव कमाविले. रणजी सामन्यात सुरवातीस मुंबई संघाचे नेतृत्व त्यांच्याकडे होते.

### फलंदाजीचे स्वरुप

श्री. जाय हे आक्रमक फलंदाज म्हणून प्रसिद्ध होते. क्रीडामंचावर आले की स्थिर होण्यास जो थोडा अवधी लागेल तेवढाच. एकदा दृष्टी सरावली की चेंडूचा टप्पा गाठण्यासाठी झेप घेणे. गोलंदाजाच्या पंजाच्या हालचालीवरून वेध टिपणे व झेप घेऊन तो जोराने फटकावणे हे त्याच्या फलंदाजीचे वैशिष्टच. त्यामुळे झेप घेताना डौलदार उडी मारून फळीने चेंडू सीमापार करणे प्रेक्षणीय असे व या त्याच्या असल्या आक्रमक खेळावर प्रेक्षक खुश असत. त्याचा मारा चौफेर असे पण विशेषतः ऑफ ड्रायव्ह हा त्याचा आवडता फटका असे. थोडक्या वेळात धावाची संख्या वाढविणे व खेळ प्रेक्षणीय करणे हे त्यांचे उद्दिष्ट असे, त्यामुळे खेळात घाई दिसून येई. गोलंदाज त्याच्यावर कधीच मात करू शकत नसे. एका षट्कात दोन तीन चेंडू—मग ते खेळण्यास कठिण असले तरी सीमापार करणे त्यांना आवडत असे. वेळ काढून धावांचा डोंगर रचण्याची कल्पना त्यांच्या प्रकृतीस मानवत नसे. त्यामुळे त्यांचा खेळ प्रेक्षणीय होत असे. त्यांच्या चौफेर फटकेबाजी व ऑफ ड्राइव्हमुळे ते थोडचा वेळात दमत असत. त्यांचा हा दणकेबाज खेळ पाहून वेस्ट इंडिजचा प्रसिद्ध खेळाडू कोन्स्टनटाइन याने प्रसंशोद्गार काढले. होते व ऑफ ड्राइव्ह ज्या कौशल्याने जाय घेतात त्या कौशल्याने पायाच्या पंज्यावर राहून मागे रेलून जर चेंडू फटकाविण्याचे—पुल करण्याचे—शस्त्र त्यांनी आत्मसात केले तर त्यांच्या इतका दणकेबाज व जलद धावा काढणारा फलंदाज दुसरा कोणी होणार नाही असा अभिप्राय त्यांनी प्रगट केला होता व श्री. जायला या फटक्याचे





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

प्रात्यक्षिकही करून दाखविले होते. त्यांच्या फलंदाजीकडे पाहून आपण बरेच धडे घेतले असल्याची कबुली श्री. विजय मर्चंट यांनी वारंवार दिली आहे.

**चौरंगी सामने**:– १९१२ पासून १९३६-पर्यंत (मधली काही वर्षे सोडून) जवळ जवळ २४ वर्षे खेळण्यात आले. श्री. जाय जवळ जवळ सोळा वर्षे यात खेळले. १९३४–१९३५ या दोन वर्षी झालेल्या रणजी सामन्यात त्यांनी मुंबई संघाचे नेतृत्व करून संघास विजय मिळवून दिला व १९३६ साली झालेल्या पंचरंगी सामन्यातही जरी ते हिंदुसंघाच्या बाजूने खेळले तरी श्री. जाय यांनी मुख्य कामगिरी चौरंगी सामन्यात केली व पराक्रमही त्याच सामन्यात दाखविला. श्री जाय हे मुंबईतील चौरंगी सामन्याचे एक खास यशवंत फळ आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

मुंबईतील जातीप्रधान चौरंगी सामने हे त्यावेळी इतर ठिकाणच्या तशा प्रकारच्या सामन्यापेक्षा अधिक महत्वाचे, अधिक लोकप्रिय होते इतकेच नव्हे तर त्यांचे हे महत्व सर्व हिंदुस्थानात मान्य झाले होते. हे सामने आयोजित करण्याची व ते यशस्वी रितीने पार पाडण्याची जबाबदारी मुंबईतील जातीय जिमखान्यानी घेतली होती.

युरोपियनचा संघ आयोजित करण्याचे बॉम्बे जिमखाना करीत असे तर पारशी, हिंदु व मुस्लीम संघाची जवाबदारी त्या त्या जातीचे जिमखाने करीत असत. पंचरंगी सामने सुरू होऊन "शेष" संघ या चुरशीत घेण्यात आला व त्या संघाची जवाबदारी कॅथोलिक जिमखान्याने घेतली.

क्रिकेट हा इंग्रजांचा राष्ट्रीय खेळ. त्यावेळी हिंदुस्थानात आलेल्या इंग्रजानी या खेळाची सुरवात केली. हा खेळ पारशी जातीने प्रथन उचलला व या दोन जातीत प्रथम हे सामने सुरू झाले. हळू हळू या खेळाची आवड हिंदूत होऊ लागली व हिंदुतील इतर क्षेत्रात नाणावलेल्या व्यक्तीनी त्यात प्रामुख्याने भाग घेण्यास सुरवात केली. प्रो. पंढरीनाथ काशीनाथ तेलंग, कै. चुनीलाल मेहथा व त्यांच्या सारख्या इतर हिंदू समाजात मान्यवर झालेल्या व्यक्तीनी या बाबतीत फार मोठे कार्य केले. त्यानंतर १९०४ पासून हिंदु संघाचा या सामन्यात समावेश करण्यात आला व त्यामुळे ते "तिरंगी" झाले. १९१२ पासून मुस्लीम संघाचा समावेश करण्यात आल्यामुळे त्यांना "चौरंगी" स्वरुप प्राप्त झाले. १९३० पासून या क्रीडाजीवनात राजकारणाचे पडसाद उमटू लागले. त्यामुळे १९३२ साली जो हिंदी संघ इंग्लंडच्या दौऱ्यावर गेला त्यात श्री. जाय, विजय मर्चन्ट व चंपक मेथा यांची निवड झाली असताही हिंदु जिमखान्याने या दौऱ्यावर बहिष्कार घातल्यामुळे शिस्तपालनासाठी ते निवडलेल्या संघाबरोबर जाऊ शकले नाहीत. श्री. जाय व श्री. चंपक मेथा (हे अकाली वारले) याना आपला क्रिकेटमधील पराक्रम दाखविता आला नाही. फक्त श्री. विजय मर्चन्ट त्यानंतर आपला पराक्रम दाखवू शकले. श्री. जाय हे १९३६ सालच्या हिंदी संघातून इंग्लंडच्या दौऱ्यावर गेले तरी त्यावेळी पूर्वीप्रमाणे त्यांच्या खेळात तेज राहिले नव्हते. इंपिरियल (सध्याची स्टेट बँक ऑफ इंडिया) सारख्या मोठ्या बँकेच्या जवाबदारीच्या हुद्यावर त्यांना काम करावे लागल्यामुळे या खेळास द्यावयास पाहिजे तितका वेळ ते देऊ शकले नाहीत. व त्यानंतर ते प्रथम श्रेणीच्या क्रिकेटमधून निवृत्त झाले होते. पंचरंगी सामने जरी सात आठ वर्षे खेळण्यात आले, तरी या सामन्यावर जातीयतेचा शिक्का मारण्यात येऊन ते बंद करण्यात यावेत व त्याऐवजी "रणजी" सामने घेण्यात यावेत अशी बेगडी राष्ट्रीय वृत्तीचा या क्रीडाक्षेत्रात जोर झाला. व हळू हळू पंचरंगी सामने क्षीण होत होत शेवटी बंद करण्यात आले.

**चौरंगी सामन्याची कामगिरी**

या चौरंगी पंचरंगी सामन्यानी भारतीय क्रिकेटच्या विकासात फारच महत्वाची कामगिरी बजावली आहे. याचे कारण जे जातीय जिमखाने हे सामने आयोजित करीत ते आपली जबाबदारी पूर्णपणे पार पाडीत असत. त्यांच्या हातून चुका झाल्या नाहीत असे नाही पण एकंदर जबाबदारी या संस्था ओळखून असत व त्यासाठी प्रयत्न करीत असत. जातीचे नांव खाली पडू न देण्याची प्रत्येक संस्थेची वृत्ति होती. त्यामुळे या सामन्यात एक प्रकारची फलदायी चुरस दिसून येई. सर्व हिंदुस्थानात आपल्या जातीत चांगला खेळाडू असला तर तो शोधून काढून त्याची निवड करून त्याची योग्य बडदास्त ठेवीत असत व आपला जातीय संघ वरचढ कसा होईल याची त्या जिमखान्यास काळजी वाटत असे व त्यासाठी ते कसून प्रयत्न करीत. यामुळे या मुंबईतील चौरंगी सामन्यास अखिल भारतीय महत्व प्राप्त झाले होते. कराची, लाहोर, नागपूर येथेही असले सामने होत असत पण मुंबईतील सामन्याला अधिक लोकप्रियता व आकर्षण प्राप्त झाले होते. एक तर मुंबईकराना क्रिकेटच्या खेळाचे वेड आहे. इतर कोणत्याही खेळापेक्षा या खेळाचे आकर्षण अधिक. ज्यांचा हा खेळ त्या इंग्लीश लोकांचे येथे वास्तव्य होते व ते या खेळास या ना त्या रीतीने उत्तेजन देत असत. बॉम्बे जिमखाना निरनिराळ्या चांगल्या

स्वच्छता व टापटीप यामुळे लोकादरास पात्र झालेले
मामा काणे यांचे
स्वच्छ उपहार गृह
(स्थापना १९१०)
दादर, मुंबई २८.
B.Y.P.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

खेळाडूस–जरूर पडल्यास इंग्लंडमधील कौंटीजमधून बोलावून घेत असत. त्यांच्या जाण्या येण्यावर व खेळावर खर्च करीत असत. त्यामुळे चुरस होणे अपरिहार्य असे. तिसरी आणि महत्वाची गोष्ट म्हणजे सर्व हिंदुस्थानातील प्रत्येक जमातीतील निवडक खेळाडूंचा खेळ त्या दहा–पंधरा दिवसात एकदम पाहावयास मिळण्याची सोय होत असे. त्यामुळे या सामन्याना उत्सवाचे स्वरुप आले होते. हिंदु संघ निवडून क्षेत्रात उतरविण्याच्या कामी मुंबईतील पी. जी. हिंदु जिमखान्याने फारच महत्वाची कामगिरी बजावली. तीस चाळीस वर्षांमागे त्या जिमखान्याचे वातावरण क्रिकेटमय असे व चौरंगी सामन्यांच्या कालात या वातावरणाला उधाण येत असे.

## त्या काळचे एकंदर वातावरण

ज्या उद्देशाने त्या काळी या जिमखान्याची स्थापना झाली ते सर्व या मैदानी खेळाना उत्तेजन देणारे होते. क्रिकेटच्या खेळात हिंदू संघ बलवान करण्याच्या मुख्य उद्देशानेच या जिमखान्याची स्थापना करण्यात आली होती व त्यासाठी पत्ते किंवा इतर बैठ्या खेळाना जिमखान्यात मज्जाव होता. गप्पा मारणे ही किरकोळ बाब समजली जात होती व ती फक्त वृद्ध सभासदांच्या वाट्यास येत असे. तरुण खेळाडूनी हिरवळीवर मैदानात फलंदाजी, गोलंदाजी किंवा क्षेत्ररक्षण यापैकी कोणती तरी गोष्ट करण्यात आपला वेळ घालवावा असे मानले जाई व खेळाडूंकडूनही या गोष्टी कटाक्षाने पाळल्या जात. अधिकारावर असलेले जाणते व वयोवृद्ध सभासद या गोष्टी पाळल्या गेल्या पाहिजेत असे मानीत असत व प्रसंगी तरुण खेळाडूना योग्य ती समज देत व तरुण खेळाडू त्यास मान देत असत. एवढी शिस्त या पिढीतील खेळाडूत होती. स्वतःच्या लहान सहान यशावर चढून जाऊन स्वतः कोणी तरी मोठे आहोत असे त्यावेळचे खेळाडू समजत नसत. स्वतःच्या प्रत्यक्ष खेळातील कौशल्यापेक्षा त्या संबंधी अधिक वाच्यता स्वतःच करून दाखविण्याचा अर्थ "घमेंडीत" जमा होत असे. खेळाडूंच्या अशा शिस्तपूर्ण, संयमशील व निगर्वी वागणुकीचा "जुन्या आणि जाणित्या" अधिकारावर असलेल्या व्यक्तींवरही साहजिक चांगला परिणाम होई व त्यांच्याकडे सहानुभूतिपूर्वक पाहात असत. ते चांगल्या खेळाडूना उत्तेजन देऊन त्यांच्या अंगच्या गुणाना विकास करण्यात प्रोत्साहन देत. खेळाडू स्वतःच विकास करून घेत व त्यामुळे संघास बळकटी येई. अधिकारी व्यक्तींना जबाबदारी समजत असे. संघाची असलेली कमकुवत बाजू भरून काढण्याचा दीर्घ प्रयत्न होत असे. या दृष्टीने हिंदु जिमखान्यातर्फे जबाबदार अधिकारी व्यक्ती या नात्याने श्री. लक्ष्मीदास रावजी तेरसी यांनी त्यावेळी फारच मोलाची कामगिरी केली आहे. १९११ पासून १९३९ पर्यंत हिंदु जिमखान्याचे ते "अनभिषिक्त राजे" होते. त्यांनी या

★ पान २३ वर पहा ★


# जुन्या पद्धतींच्या नांगराऐवजी ट्रॅक्टर











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




—प्रा. अंबिका सरकार

**घड्याळात** पांच वाजलेले पाहिले आणि निर्मल उठली. थोड्या प्रयासाने नवा निश्चय मनात नीट घोळवित उठली. मुलांच्यात वेळ न घालवता, न्हाणीघरात तोंड धुवायला गेली. गेले काही दिवस तिने ठरवून टाकलं होतं की मनोहर घरी यायच्या वेळी व्यवस्थित नीटनेटकं असायचं. घरातला पसारा आवरून ठेवायचा. मुलाना कपडे करून तयार ठेवायचं आणि त्यानं आल्यावर मुलांची चौकशी केली की पाचदहा मिनिटात त्याना फिरायला नेणाऱ्या गड्याच्या स्वाधीन करायचं. पुढचे दोन तास केवळ मनोहरबरोबर घालवायचे. त्याची लहर असली तर बाहेर फिरायला जायचं.

हे सारं ठरवलेलं असूनही तिचं मन विषादानं भरून आलं. लग्नाला सहा वर्षं होऊन गेल्यावर नव्या प्रेयसीप्रमाणे आपण मनोहरला पुन्हा आकर्षित करण्याचा प्रयत्न करतो आहोत या विचारानं मन झाकळून आलं. मोठ्या गळ्याचा ब्लाऊज घालून त्यावर मनोहरची आवडती निळी साडी नेसता नेसता मनात हा विषाद कोंदून राहिला होता. औषधाची कडू चव जिभेच्या



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मागच्या भागावर रहावी. संत्र्याच्या फोडीने साखरेनेसुद्धा पुरी जाऊ नये तसा.

'विवाहितेला सल्ला' या मथळ्याखाली एक स्त्रियांच्या खास मासिकात आलेला उपदेश—पतीचं मन कसं सांभाळावे. त्याची ही कृति. एकाद्या खायच्या पदार्थासारखी.

पति दमून भागून घरी येण्याच्या वेळी चेहरा प्रसन्न असावा.

वेशभूषा व केशभूषा त्याच्या आवडीची असावी. पति घरी येताच त्याला सस्मित सामोरे जावे........ लग्नाला काही वर्षं उलटली असली तरी शारीरिक आकर्षण कमी होणार नाही याची काळजी घ्यावी.................शारीरिक आकर्षण.....शारीरिक आकर्षण..........

नटूनथटून खिडकीत उभे रहावे.

कुणी वर पहाताच स्मित करावे.

खूण करून वर बोलावून घ्यावे....

निर्मल शहारली. मनातले अभद्र विचार निरखून टाकीत घाईघाईनं मुलाकडे वळली. त्याना खायला घालून कपडे बदलून दिले.

★★

वाट पाहून निर्मल थकून गेली. मुलाना केव्हाच तिनं गड्या-बरोबर बाहेर पाठवून दिलं. भरलेल्या पण त्या सुन्या वाटणाऱ्या घरात ती भिरभिर फिरत राहिली. बारिक-सारिक कामं काढून ती आवरीत बसली. फाटक्या पलंगपोसाला शिवण घातली. मनोहरच्या शर्टाची तुटलेली बटणं लावून झाली. अगदी वेळ जाईना तेव्हा आपल्या ठेवणीच्या कपड्याची बॅग तिनं लावायला घेतली. मनोहरला उशीर कां झाला याची थोडी कल्पना असूनही आज खरंच ऑफिसमध्ये काम जास्त पडलं असेल अशी मनाची समजूत काढीत राहिली. ठेवणीतल्या रेशमी साड्या हातावर घोळवीत राहिली.

**विवाहानंतर इतकंच काय मुलं झाल्यावर सहा वर्षांनी निर्मलेनं आपल्या मनोहरबरोबर प्रेयसीप्रमाणं वागण्याचं ठरविलं खरं पण ते तिला अखेरीला जमलं का ?**

मनोहर आला तेव्हा साडेसात वाजून गेले होते.

"आज उशीर झाला. ऑफिसात काम फार होतं वाटतं ? "

"नाही ग, रत्नाला पोचवायला बसस्टॉपवर गेलो होतो. तिची बस लवकर आली नाही आणि उशीर झाला." अपेक्षित उत्तर आलं. अगदी सहजपणे—अकृत्रिमपणे.

"बाकी आज बस लवकर आली नाही रत्नाची ते बरंच झालं म्हणा. आजच तिनं स्टाईनबेकचं "इस्ट ऑफ इडन" वाचून संपवलं. त्यावरून बोलणं निघालं. मग मी म्हटलं समोरच्या हॉटेलात चहा घेता घेताच बोलू. बसस्टँडवर कितीसं बोलणार ?"

"आवडलं का तिला पुस्तक ?"

"आवडलं म्हणजे.......? तू वाचून तर पहा. इतके दिवस मी तुझ्यामागे लागलो आहे वाच म्हणून. रत्नानं नेल्यापासून आठ दिवसात वाचून दिलं. नाहीतर घरी दोन वर्षं पडलं असून तुला उघडायला झालं नाही."

निर्मलनं हलका सुस्कारा टाकला. इस्ट ऑफ ईडन हजार पानांचं पुस्तक. सकाळी साडेसात ते एकपर्यंत शाळा. उन्हातून तळतळत घरी आल्यावर जेवण. दोन तास तरी विश्रांति घेतल्या-शिवाय डोकं वर उचलत नसे. घरी तपासायचे वह्यांचे गठ्ठे. दोन मुलांचे कपडेलत्ते, अभ्यास, खाणंपिणं सारं पाहायचं. दुसऱ्या दिवशी लवकर उठायचं असल्यानं दहाच्या सुमाराला अंथरुणा-वर अंग टेकायचं.

हल्ली किती वेळा संसाराचा कंटाळा येत असे. पुन्हा लग्ना-आधीसारखं लायब्ररीत तासचेतास बसावं, वाचता वाचता टिपणं काढावीत, अभ्यासाची धुंदी पुन्हा अनुभवावी असं वाटत असे. हे सारं तिनं मनातल्या मनात गिळून टाकलं

मनोहरकरता मुद्दाम चांगला स्वयंपाक करायला सांगितला होता पण अवेळी चहा झाल्यानं त्याला भूक नव्हती. जेवणात लक्ष नव्हतं. तो एकटाच नादानादात बोलत होता. ऑफीसच्या गोष्टी...आज रत्नानं हातात घातलेलं नाजूक ब्रेसलेट... रत्ना कसला तरी मंद सेंट लावते. तूं कां सेंट वापरीत नाहीस ग...

निर्मल खरकट्या पानात बोटं फिरवीत बसून राहिली होती.

★★

जेवण झालं. मनोहर बेडलॅम्प लावून 'पुन्हा ईस्ट ऑफ इडन' वाचीत पडून राहिला.

निर्मलचं मन दाटरून आलं. मुद्दाम नेसलेली निळी साडी तिनं सोडून ठेवली. ठेवणीच्या कपड्याच्या बॅगेत साडी ठेवून भारल्यासारखी ती तिथेच बसून राहिली. डाव्या हाताने साड्यांचे रेशमी पोत घोळवीत राहिली. चाळा करता करता बॅगेच्या तळाला ठेवलेली मनोहरची पत्रं हाती आली.

"निर्मल, तू मला होकार दिलास तेव्हा मी काय केलं सांगू ? बसमध्ये बसून मुंबईभर हिंडलो. बसच्या अगदी पुढच्या सीटवर बसून सारं वारं अंगावर घेतलं. वारं असं डोळ्यात शिरलं की डोळ्यातून पाणी वहायला लागलं...आनंदानं कोंदून गेलेलं मन अखेर हलकं झालं...

तुझा अबोल चेहरा मला समईच्या प्रकाशात पहायचा आहे...

आणि खरंच सुरुवातीला सारे विजेचे दिवे मालवून वेडा समई लावून बसत असे.

एका पत्रात बकुळीची दोन फुलं होती त्यांचा सुवास मात्र आता उडाला होता.

पहिल्या गर्भारपणी त्यानं लिहिलं होतं...... तुझे दात इतके का शिवशिवतात ग ? माझ्या दंडावर अजून तुझ्या दाताची खूण आहे. अशानं आपलं बाळ चावरं झालं म्हणजे...

हे सारं कुठे गेलं होतं? कां नाहीसं झालं होतं ? आपण जुन्या झालो म्हणून सारं संपलं ? नेहमी असंच होतं ? सगळ्यांच्या बाबतीत हेच घडतं. फुलं कोमेजून निर्माल्य होतं ? बकुळीच्या






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

फुलाचाही सुवास जातो? आणि तरी 'पतीला आवडेल अशी वेशभूषा करावी......?

प्रियकराला सर्वस्व दिलं म्हणजे परिपूर्णता येते असं वाटलं होतं, पण नवऱ्याला सर्वस्व देऊन भागत नाही. ते सर्वस्व आकर्षक रंगीबेरंगी कागदात गुंडाळून भेटवस्तूसारखं दिलं पाहिजे, सतत देत राहिलं पाहिजे.........फार प्रमाणात वापरात आलेल्या चलनासारखी त्या प्रेमाची किंमत उतरत गेली तरी हसतमुखानं देखावा केला पाहिजे...........

**

पहाटे रोजच्यासारखी जाग आली नाही. पंधरा मिनिटं अगोदर डोळे साफ प्रसन्न उघडले. शेजारच्या खिडकीतून उगवणाऱ्या सूर्याची अगदी वरची लालकड दिसत होती. मध्येच एक पक्षी चिवचिव उडाला. खिडकीच्या शेजारच्या कॅलेंडरकडे लक्ष गेलं तारीख पंधरा एप्रिल.........आजपासून शाळेला सुटी.........लहानपणी सुटी पडली की पहिल्या दिवशी आपण कशा उड्या मारीत असू ते तिला आठवले. लहानपणी खाल्लेली चिंच.......तिची चव दातावर शिरशिरून गेली.......चिंच नाहीतर नाही पण आज आईस्फ्रूट खायचेच असा तिनं निश्चय केला. आईस्फ्रूट हवं म्हटल्यावर आई मारीत असे तशी चापटी तिनं स्वतःलाच मारली आणि ती टुणकन् उठून बसली.........पंधरा एप्रिल.......आजचा दिवस मात्र मनोहरनं आणि आपण काढायचा......अगदी पूर्वीसारखा.........

शेजारच्या वॅगेकडे लक्ष गेलं आणि तिला हसू आलं. रेशमी साड्या उसकटून ठेवल्या होत्या. मनोहरची जुनी पत्रं वाकडीतिकडी पडली होती. तिनं स्वतःशीच भांडायला सुरुवात केली. मग आता मनोहरनं तिच्याकरता काय करायला हवं होतं.. दररोज नवीनवी पत्रं लिहायला हवी होती.....? लग्नाच्या पहिल्या दिवसासारखं ऑफीसला दांड्या मारून घरी रहायला हवं होतं.........घरी रोज रात्री समई पेटवून बसायला हवं होतं...? कालचा दिवसच खराब लागला होता. त्यावर कुणी पानाची घाणेरडी लाल पिंक थुंकली होती.......आपण मनोहरसाठी नटलो आणि मग अभद्रपणे स्वतःची तुलना बाजारबसवीशी केली ते आठवून ती शहारली.....आणि असं मनोहरनं केलं तरी काय होत.. सट्टा रेस जुगार केला होता? दारूचं व्यसन लावून घेतलं होतं...? ऑफीसमधल्या एका उमद्या मुलीला एक पुस्तक वाचायला दिलं होतं. तिच्याशी त्या पुस्तकाबद्दल थोडी चर्चा केली होती. जरा तिचा वेश निरखला होता. हौसेने तिचीही दखल घेतली होती. पण हे सारं इतक्या निर्व्याजपणे झालं होतं की घरी येऊन काय झालं हे मोकळेपणानं प्रथम तिलाच सांगितलं होतं. आणि आपला स्वभाव असा मत्सरी की आपण सुतानं स्वर्गालाच गेलो. सोन्यासारखा संसार, दृष्ट लागण्यासारखी मुलं असून मनात निव्वळ जहर घोळवलं.......

तिनं खळखळून चूळ भरली......पुन्हापुन्हा पाण्यानं साबणानं चेहरा धुतला... वावत जाऊन मनोहरला गदगद हलवून उठवलं... तो इतका झोपेत होता की . झोपल्याझोपल्याच उठून बसला. ते पाहून तिला हसू आवरेना "आज पंधरा एप्रिल लक्षात आहे" "हो हो आहे तर" असं म्हणत म्हणत मनोहर पुन्हा तिच्या मांडीवर डोकं ठेवून झोपूनच गेला. अन् त्याच्याकडे पाहून तिचा एकदम उर भरून आला........

बस्...असा जिवाला त्रास करून घ्यायचा नाही... निदान आज तरी नाही. मनोहर अन् मी. मी आणि मनोहर. . .

**

अगदी संध्याकाळी तो येईपर्यंत ती त्याच उन्मादात राहिली. मनोहर वेळेवर आला.

"हं चल आता तुझी पंधरा एप्रिल करू या साजरी........" असं म्हणत म्हणत त्यानं खाली वाकून तिला कुर्निसात केला आणि भरकन् बकुळीचा गजरा नजर केला...ती खळखळून हसली.

"चल वात्रटपणा नको करू............."

"हां बाईसाहेब तुमचा रुमाल द्या बरं इकडे आज. त्या पंधरा तारखेसारखा तो माझ्याजवळ असायला हवा......." तिनं रुमाल दिला तेव्हा त्यानं हट्टानं सेंट मागून पूर्वीसारखं त्यावर ते शिंपडून घेतलं.......

"मग आज वरळी सी-फेस. तिथल्या त्या आपल्या खडकाला भोज्या म्हणून शिवायचं अन् मग बर्व्होरेलीत जायचं.... असंच ना निर्मल....." निर्मल हुंकारली अन् मनातल्या मनात तिनं स्वतःच्या थोबाडीत मारून घेतली. तो विसरला म्हणून आपण चिंचा चिवडाव्याइतकी डोक्यात राख घालून घेतली आणि आपणच विसरलो होतो ते मनोहर विसरला नव्हता......

इतक्यात दारावरची बेल वाजली. निर्मलनं दार उघडलं. एक छोट्या बांध्याची अनोळखी मुलगी दारात उभी होती....



इंदिराबाईंनी कच्छ निवाडा मान्य करून 'जंते'ला चांगलेच 'फुल' केले.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




सर्व बळ एकवटून...एकीने...जिद्दीने खेचून घेऊ.

परिश्रमांची पराकाष्ठा करून...प्रयत्नांचे समाधान व यशाचा निर्भेळ आनंद पदरी पाडून खेचत रहाण्याचे तंत्र आम्हाला सुरुवातीपासून साध्य झाले आहे.

'स्वस्तिक'ला रबर धंद्यातील अग्रस्थान प्राप्त होण्यापूर्वी—

एका छोट्या शेडमध्ये धंद्याची अल्पांशाने सुरुवात ...२५ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव...तज्ञांचा सखोल अभ्यास....मालाची विक्रीपूर्व चाचणी...आणि याहीपेक्षा अधिक म्हणजे मनातील जिद्द.

सहाजीकच आमच्या रबरी उत्पादनांचा दर्जा सर्वोत्कृष्ट आणि अजोड असणारच.

'स्वस्तिक'ची काही रबरी उत्पादने—

होज पाइप्स, रबरी बुचे, ऑटो पार्टस्, ऑईल सील्स्, अॅडीसीव्हज्, हवामानविषयक बलून्स्, लॅटेक्स उत्पादने-उदा. हातमोजे (शस्त्रक्रीयेसाठीं, औद्योगिक व घरकामासाठी), रबर गमबूटस् आणि कॅन्व्हॅस बूट्स् व इतर विविध पादत्राणे.

स्वस्तिक

स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लिमिटेड, खडकी, पुणे-३.

TOM & BAY SR/6686-86





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



अनुक्रमणिका

××× आहेत का घरात..........."

अगदी बुजरे शब्द.

रत्ना, तू आलीस ? घर कसं सांपडलं ?

"हे पुस्तक परत करायला यावं लागलं. आपलं लायब्ररीचं पुस्तक त्यावर उद्याची तारीख आहे..........लगेच पाठ वळवून जायला निघालीही अर्थातच मनोहरनं तिला आत बोलावून घेतलं. निर्मलनं तिला सरबत आणलं.......आणलेल्या पुस्तकाविषयी मनोहर तिच्याशी बोलत राहिला. निर्मल दोघांकडे पहात राहिली.......

स्वत:ला विसरून मनोहर तल्लीन होऊन बोलत होता.... अन् रत्ना ऐकत होती. १९–२० वर्षांची, लाजरी, विलक्षण आकर्षक रत्ना, मनोहरनं वर्णन केलेला रातराणीसारखा वासाचा सेंट तिच्याभोवती दरवळत होता. नजर सारखी पायावर खिळलेली, मधून डोळे उचलून मनोहरकडे पाही तेव्हा चेहऱ्यावर आदर अगदी ओसंडत होता. रत्ना भारावून ऐकत होती. आल्या-आल्याच जाते म्हणणारी रत्ना आता जायचं विसरून गेली होती. नव्या वाचनाच्या, नव्या जगाच्या उन्मादानं भरली होती. ते अपरिचित जग पाहाताना भांवावली होती. मनोहरच्या बोलण्यातून ते जग अधिक नीटस आकार घेत होतं. आजची तारीख विसरून मनोहरही रसिकपणे तिच्याशी बोलण्यात गुंतला होता. निर्मल मनोहरची वाट पहात परक्यासारखी उभी होती.

फिरायला निघेपर्यंत इतका उशीर झाला की मनोहर म्हणाला "आता आज जायचं का ? उशीर होणारसं दिसतं."

....सहा सात वर्षांपूर्वी खरं म्हणजे असाच उशीर झाला होता. थोडा काळोखही पडू लागला होता. तिचा हात हातात घेऊन मनोहर आडोशाची निवांत जागा शोधत होता पण निर्मल कावरीबावरी झाली होती. तिला एकाएकी घरी जावंसं वाटलं होतं. डोळ्यात चटकन् पाणी येईलसं वाटलं होतं. मनोहरनं अगदी हळूवार हट्टानं तिला बसवून घेतलं होतं. आणि मग इतके दिवस ती ज्याची भित्र्या व अधीर मनाने वाट पहात होती ते घडलं होतं. लाटा खडकाच्या पायाशी येऊन विरत होत्या. समुद्राचा खारा वास अन् मनोहरच्या अंगाचा सूक्ष्म सुगंध मिसळून गेला होता. लाटांचा आवाज कानात भरून राहिला होता. अन् त्याच्या पार्श्वभूमीवर मग बर्टोरेलीत पाश्चात्य संगीताचे मंद सूर उमटले होते. निर्मल अगदी मुकी झाली होती.

....वरळीला उतरल्यावर निर्मल आपोआपच तो खडक होता त्या दिशेला वळली. पूर्वीचे तुरळक खानदानी वाडे आणि बागा जाऊन आता टोलेजंग इमारती झाल्या होत्या. पूर्वीसारखा किनारा रस्त्यावरून दिसत नव्हता. किनाऱ्याकडे जायची वाट शोधता शोधता एका इमारतीजवळ दारवानानं हटकलं.

मनोहर एकदम संतापला. "इतक्या अडचणीतून त्या खडकाकडे गेलंच पाहिजे का ? त्यापेक्षा सरळ बर्टोरेलीत गेलो तर चालणार नाही ?"

निर्मल मुकाटयाने मागे वळली.

बर्टोरेलीत शिरता शिरता मनोहरचा एक जुना मित्र भेटला. तोपण तेथेच येत होता. त्याच्यावरोबर रत्नाइतकीच बुजरी मुलगी होती. मनोहरने मित्राला हाक मारली तेव्हा एकदाच डोळे उचलून तिने वर पाहिले तेवढेच. पुढे सारा वेळ तिची नजर पायाच्या बोटातच अडकलेली होती. मित्राचं मनोहरच्या बोलण्यावर फारसं लक्षच नव्हतं. त्याचे डोळे तिच्यावर खिळलेले होते. चेहरा आनंदाने नुसता कोंदाटून आला होता. अगदी जुजबी औपचारिक बोलून तो दूरच्या टेबलावर जाऊन बसला.

"हं ! निर्मल काय मागवायचं सांग. १५ एप्रिलला आपण पुलावमटणकरी घेतली होती ना?" मनोहर स्निग्धपणानं म्हणाला.

निर्मलला १५ एप्रिलचा उल्लेखही नको वाटत होता. मनोहरने ऑर्डर दिली व तिचा हात हलकेच हातात धरला. त्याच्या हातांचा घामच जाणवत होता. बर्टोरेलीत चारपांच वादक व एक गायिका मिळून उत्तान गाण्याचा धांगडधिंगा चालू होता. हे सारं इथेच टाकून पळत सुटावं असं वाटत होतं.

जवळच्याच टेबलावर बसलेला मनोहरचा मित्र मात्र आज गुंगलेला होता. ती मुलगी त्याच्याकडे स्निग्धपणे पहात होती. तसं पहाताना त्यानं पकडलं की लाजत होती. बुजलेली-अवघडलेली दिसत होती.

निर्मलच्या मनात आलं सहा सात वर्षांनी हिचंही असंच होईल. आज फुललेली संध्याकाळ काही वर्षांनी फसलेली असेल. भान हरपलेलं हे बुजरं मूकपण हरवेल आणि अगतिक मूढपणा येईल. हिचं, रत्नाचं, प्रत्येक उमलत्या कळीचं असं होईल........

शेपूटतुटक्या कोल्ह्यासारखे हे विचार मनात आल्यानं निर्मलला स्वत:चीच घृणा आली आणि थिजलेल्या डोळ्यानी ती समोरचा पुलाव चिवडू लागली.

●


**सरकारमान्य वायरमन कोर्स....**

**६ व १ महिन्याचे शिवाय रविवारचे वेगवेगळे वर्ग. पाळी बदलणाऱ्यांना सोइस्कर अशा वेळां – मराठी, हिंदी व इंग्रजीतून वेगवेगळ्या बॅचेस. इलेक्ट्रिशियन, सुपरवायझर, वाईंडिंग व रेडियो रिपेअरींगचे वेगळे वर्ग.**

**प्रक्टिकलसह शिक्षण. प्रत्येक महिन्याच्या २, ११ व २२ तारखेस नव्या बॅचेस. भेटा:– सकाळी ७ ते रात्री ८.**

अगर लिहा :– **"दादर इलेक्ट्रिक इन्स्टिट्यूट,"**

**पोर्तुगीज चर्चशेजारी, '१६५' बस स्टॉपसमोर, दादर (वे.रे.), मुंबई–२८.**









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट



**'एप्रिल फूल'चे स्वरुप मुख्यतः बालीश असे आहे. कारण रुढीच मूळात बालीश आहे. त्याचा प्रौढ प्रकार मात्र तितकासा चांगला नाही. उदा. "तिनं तिच्या नवऱ्याला बेमालूम एप्रिल फूल केला, अर्थात् त्याच्याशी लग्न करून."**

# एप्रिल फूलची कहाणी

संग्राहक—ह. शि. खरात

**मार्क ट्वेनच्या** मते 'एप्रिल फूल' दिन हा असा दिवस आहे की त्यादिवशी आपण इतर ३६४ दिवस कोण आहोत याचे स्मरण दिले जाते. यादिवशी जन्माला येणारा माणूस इतर दिवशी आपली कोणी चेष्टा करू नये म्हणून आपली जन्मतारीख गुप्त ठेवण्याचा प्रयत्न करतो. दोन एप्रिल रोजी जन्मणाऱ्या माणसाचीही तीच अवस्था होते. कारण 'एकच दिवस उशीर झाला' ही जाणीव त्याला आयुष्यभर बोचत असतेच. त्याप्रमाणे मे व जूनमध्ये जन्मणाऱ्या व्यक्तिचं नांव अनुक्रमे 'Mayflower' किंवा 'June bug' असं ठेवतात. त्याचप्रमाणे एप्रिलमध्ये जन्मणाऱ्याचे बालपणीचे नांव 'एप्रिल फूल' हे शोभते. परन्तु 'एप्रिल फूल' ही पदवी फक्त त्यालाच मिळते जो एक एप्रिल रोजी प्रत्यक्ष चेष्टा मस्करीला बळी जातो.

'एप्रिल फूल' हा दिन सर्व ठिकाणी तरी साजरा केला जातो तरी त्याचे मूळ मात्र गूढतेच्या पडद्याआड गेले आहे. फ्रान्समध्ये 'एप्रिल फूल' ऐवजी 'एप्रिल फिश' हा शब्द वापरतात. तर स्कॉटलंडमध्ये 'April Gowk' हा शब्द वापरतात. कारण 'Gowk' म्हणजे कोकिळा ही तिकडे मूर्खपणाचं प्रतीक मानतात. 'एप्रिल फूल' या रुढीच्या जन्मासंबंधी अनेक उत्पत्ती आहेत. त्यापैकी काही पौराणिक तर काही ऐतिहासिक आहेत. परन्तु त्या साऱ्याच जवळ जवळ असत्य आहेत. काही एक दोन मान्य उत्पत्ती तर इतक्या हास्यास्पद आहे की त्या 'एप्रिल फूल' चाच एक प्रकार असावा असं वाटतं.

अनेक शतकांपूर्वी काही मूर्ख निरोपे जवळच्या ठिकाणी पाठवून हा दिन पाळला जात असावा असं दिसतं. पुढे या मूर्खांच्या बरोबर ज्याना संशय येणार नाही अशा मुलाना व नोकराना अशा बिनबुडाच्या निरोपयात्रेत धाडण्यात येवू लागले. जसजसा काळ गेला तसतसे या थट्टांचे प्रकार वाढत गेले. त्यात प्रत्यक्ष चेष्टा मस्करीची भर पडली. या थट्टामस्करीचे प्रकार दोन आहेत. एक निरुपद्रवी व दुसरी उपद्रवी.

निरुपद्रवी प्रकारात ज्या गोष्टी दुर्मिळ आहेत, अशा गोष्टी शोधून आणण्याकरिता मुलाना किंवा मोठ्याना पाठवितात. त्यापैकी जास्त प्रचलीत प्रकार म्हणजे एखाद्याला 'चारफुटी रूळ', वाफेचा घडा, किंवा कबुतराचे पिंटभर दूध शेजारील शेतकऱ्यांकडून आणण्यास सांगणे. तसेच एखाद्या पुस्तक विक्रेत्याकडून 'इव्ह'च्या आजीचा इतिहास हे पुस्तक आणण्यास नोकरास पाठविणे ही पद्धत त्याकाळी परंपरागत होती. एकदा का ती व्यक्ति फसली की त्याचे 'एप्रिल फूल' 'एप्रिलफूल' या घोषणात स्वागत केले जाई.

'एप्रिल फूल'चा दुसरा प्रकार मात्र निर्दय व दुःखकारक असा आहे. या प्रकारात एखाद्या मुलास चांभाराकडे पट्ट्याचं तेल आणण्यासाठी पाठवीत असत. तो चांभार काय प्रकार आहे हे ओळखून पट्टा काढून त्या मुलाला बेदम मारीत असे. सध्या स्फोटक चिरुट, शॉक्‌बॉक्स किंवा पिचकारीची बंदुक वापरणे, असले एप्रिल फूलचे प्रकार बंद केले आहेत. परन्तु इतराना त्रास देणे किंवा देताना तो बघणे हा आनंद मिळविण्याची कल्पना अजूनही आहे.

आधुनिक काळात 'एप्रिल फूल' विनोदाचे स्वरुप पुष्कळच बदलले आहे. तसेच त्याने अनेक गुंतागुंतीच्या समस्याही निर्माण केल्या आहेत. महत्वाची गोष्ट म्हणजे त्यातील वैयक्तिकपणा जाऊन त्याला फार मोठ्या प्रमाणात सामूहीकता आली आहे. १९३४ सालच्या एक एप्रिलला कोट्यवधी अमेरिकन लोकांनी स्वतःच्या शक्तीने आकाशात उड्डाण करणाऱ्या व्यक्तीची बातमी वर्त-





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मानपत्रात वाचली आणि हवेत संचारणाऱ्या त्या इसमाचा फोटोसुद्धा पाहिला. परन्तु खरे पहाता ही बातमी विश्वनीय समजून अमेरिकन वर्तमानपत्रानी युरोपियन वर्तमानपत्रांच्या 'एप्रिल फूल' विशेषांकातून पुनःमुद्रित केली होती.

'एप्रिल फूल'च्या कथा बऱ्याच प्रमाणात वर्तमानपत्रांकडे येतात. परन्तु सामान्यतः प्रसिद्धी आधी त्यांचा खरेखोटेपणा पडताळण्यात येतो. पण तसे केले नाही तर मात्र अनेक गमतीदार गोष्टी घडतात. एक एप्रिल १९४५ साली म्हणजे 'अमेरिकन आर्मी ऑफ आक्युपेशन' यानी इटालियन लोकांमध्ये टायफॉईड प्रतिबंधक मोहीम काढल्यानंतर थोड्याच दिवसानी एका रोमन वर्तमानपत्राने जनावरांच्या म्युनिसिपल डॉक्टरमार्फत एक जाहीर खबर दिली. अचानक टॉयफॉईडची सांथ उद्‌भवल्याने सर्व कुत्र्यांना प्रतिबंधक लस टोचण्यासाठी घेवून यावे, असे त्या जाहिरातीत होते. त्याप्रमाणे तेथे जवळजवळ दोनशेच्या वर कुत्र्यांचे मालक आपापली कुत्री घेवून गर्दी—गोंधळात जमा झाले. पण थट्टेखोरानी आपल्याला 'एप्रिल फूल' केले हे जेव्हा त्यांच्या ध्यानी आले तेव्हा भयंकर घुश्यात ते सारे तणतणत गेले.

वर्तमानपत्रातील बातम्यांप्रमाणेच त्यातील जाहिरातींचा एप्रिल फूलसाठी उपयोग केला जातो. अशाचपैकी एक जाहिरात लंडन वर्तमानपत्रात आली होती. कोणत्याही प्रकारची काळी मांजरे स्वतःहून आणून दिल्यास ती विकत घेवू असे, त्या जाहिरातीत होते. ठरल्यावेळी दिलेल्या पत्त्यावर जवळजवळ हजारो लोक काळी मांजरे घेऊन आले होते, पण दिलेला पत्ता म्हणजे ओसाड घर होतं!!

एप्रिल फूल विनोदाच्या विकासात ज्याप्रमाणे वर्तमानपत्रानी पुष्कळच प्रगती केली, त्याचप्रमाणे टेलिफोनच्या शोधानी सुद्धा केली. सध्या अशा प्रकारच्या टेलीफोन बनवेगिरीत लोकप्रिय थट्टा म्हणजे प्राणि संग्रहालयाच्या लोकांना वनविणे. न्यूयॉर्कमध्ये या प्रकारचे एप्रिल फूल करणारे लोक 'Bronx' प्राणिसंग्रहालयाला फोन करून श्री. किंवा श्रीमति वाघ, सिंह, कोल्हे वगैरेशी बोलायचं आहे, असं सांगतात. ही युक्ति इतकी लोकप्रिय झाली की एक एप्रिल रोजी 'Bronx' प्राणि संग्रहालयाला तेथील नोकरवर्गासाठी फक्त शंभर कॉल्स् आले तर प्राण्यांच्या साठी मात्र २७००० चे वर कॉल्स् आले. त्यापैकी श्री. व श्रीमती लांडगे हे फार लोकप्रिय ठरले कारण त्यांच्यासाठी ६०० चे वर कॉल्स् आले. ही गंभीर समस्या शेवटी टेलिफोन कंपनीने मिटवून टाकली. टेलिफोन कंपनीने एक खास ऑपरेटर एक एप्रिलला येणारे सर्व कॉल्स् जोडण्यासाठी ठेवला. आणि फक्त प्राणिवाचक नांवे नसलेल्या माणसांचेच कॉल्स् जोडून देण्याचे काम त्याला दिले.

'एप्रिल फूल' दिन ह्या चालीमुळे 'Wisecraks Gags' व 'Jokes' या विनोदी प्रकारांची वाढ झाली. परन्तु त्यांचे स्वरूप मुख्यतः बालीश असे आहे कारण ही रुढीच मूळात बालीश आहे. एप्रिल फूलचा प्रौढ प्रकार मात्र तितकासा चांगला नाही. उदा. "तिनं तिच्या नवऱ्याला बेमालूम एप्रिल फूल केला, अर्थात् त्याच्याशी लग्न करून."

भारतात 'एप्रिल फूल' ची पद्धत कधी आली व सध्या ती कोणत्या स्वरूपात आहे याचा शोध घेणे मनोरंजक ठरेल.

★★★


आकर्षक केश रचना
तुमच्या सौंदर्यात भर घालते...







त्यांत नवलाईची केशरचना.
त्यासाठीं वापरलें पाहिजे 'अप्सरा' हेअर ऑईल.
त्यामुळें केस दाट, काळे
होतात आणि शांत झोप लागते.

डोंगरे
के. टी. डोंगरे ॲन्ड कं. प्रा. लि.
मुंबई, कानपूर, नैरोबी (आफ्रिका)

अप्सरा
सुगंधित आयुर्वेदीय औषधियुक्त
हेअर ऑईल

• अप्सरा स्पेशल • ब्राम्हो आमला • माका • जस्मीन
• रोझ • रातराणी • कॅस्टर ऑईल







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

[पान १५ वरून—एल्. पी. जाय]
आपल्या कारकीर्दीत बऱ्याच खेळाडूंना पुढे आणले व हिंदु संघ व एकंदर क्रिकेट खेळास वळकटी आणण्यास फार मोठा हातभार लावला. त्यावेळचे सर्व हिंदु खेळाडू त्यांना "वडीला"प्रमाणे मानीत असत. श्री. नायडू, पी. विठ्ठल, देवधर वगैरे० तर त्यांच्या मनाला दुखविण्यासारखी कोणतीही गोष्ट करीत नसत. त्यांचे हुकूम, त्यांनी घातलेले निर्बंध विनाविरोध मानीत असत; व श्री. तेरसी देखील क्रिकेट क्षेत्रात हिंदु खेळाडू व हिंदु जिमखाना यांची मान ताठ राहावी अशा एकाच ध्येयाने वर्तन करीत असत. श्री. जायना तर या खेळात प्राविण्य मिळविण्यात; त्यांच्या जीवनात स्थैर्य आणण्यास श्री. तेरसीच प्रामुख्याने कारणीभूत होत. इतर खेळाडूनाही त्यांनी अशीच मदत केली आहे. आपुलकी मानणाऱ्या जबाबदार व कार्यतत्पर, निस्वार्थी व्यक्ती व अशी व्यक्ती ज्या संस्थात कार्य करतात अशा संस्थाच संघातील उणीवा भरून काढण्याची कोशीस करतात. नुसत्या संघातील उणीवा कळल्या म्हणून कार्यसिद्धी होत नाही. उद्देश सफल होत नाही. तर त्या दूर करणाऱ्या संस्थाच तशा प्रकारे अभिमान राखून व जबाबदारी दाखवून वागतील तर कार्यभाग साधेल. अलिकडील क्रिकेटच्या खेळातील ही तर खरी व्यथा आहे. बदनाम करून जातीय सामने बंद करण्यात आले व त्यांचे ध्येय विशाल ठेवण्यात आले. धर्मावर केंद्रीत होणारे लक्ष राष्ट्रीय करण्यात आले; पण ते आपुलकीने, निस्वार्थी दृष्टी ठेऊन कार्यान्वित करणाऱ्या व्यक्ती व संस्था निर्माण झाल्या नाहीत. "Everybody's property is nobody's property" या न्यायाने या क्षेत्राकडे पाहण्यात येत आहे व म्हणून व्यथा समजून आली तरी उपाय सापडत नाहीत.

**श्री. जाय यांचे विचार करण्याजोगे उद्गार**

श्री. जाय यांच्याशी परिचय असलेल्यांना त्यांच्या स्वभावातील उमदेपणा पटून येत असे. नोकरीच्या निमित्ताने जेथे जेथे ते गेले तेथे त्यानी आपल्या अंगच्या हुशारीने व स्वभावातील गोडव्यामुळे लोकाना आपलेसे करून घेतले. अगदी अलीकडे परदेशी संघाबरोबर झालेल्या एका सामन्याच्या वेळी तो पाहात असताना त्यांची व माझी भेट झाली. जुन्या आठवणीना उजाळा मिळाला. चौरंगी सामन्याच्या वेळची खेळाची व शिस्तीची आठवण झाली. त्यास मी क्रिकेटच्या सध्याच्या खेळाबद्दल व फलंदाजीबद्दल त्यांचे मत व कारणे विचारी. त्यांनी त्यावेळी पुढील उद्गार काढले: "आजचे फलंदाज आक्रमक खेळ करीत नसतात. गोलंदाजाला आपल्यावर मात करू देतात. कारण जिद्दीचा अभाव. आमच्या वेळी चेंडू फटकाविण्याचे फलंदाजाचे धोरण असे. खेळास सुरवात केली की नजर सरावण्यासाठी चेंडू अडविण्यात येई. एकदा नजर सरावली की गोलंदाजाकडून येणारा चेंडू त्याच्या बोटांच्या हालचालीवरून कसा येईल याचा अंदाज आपोआप होई. गोलंदाजाच्या हातून सुटलेला चेंडू स्पष्ट दिसून येत असे व त्याच्या हवेतील प्रवासावरून व रोखावरून तो खेळपट्टीवर कसा पडेल त्याचा अंदाज करता येई. नुसता अडविण्यापेक्षा फटकावणे अगर क्षेत्ररक्षक नसतील तेथे "प्लेस" करणे हे संवयीने व सरावाने अंगवळणी पडले होते व बॅट आपोआप त्या दिशेने काम करीत असे. धावा काढणे हे त्यावेळी उद्दीष्ट असे. आवडलेले चेंडू देखील खेळपट्टीच्या बाहेर जात. सध्यासारखे गोलंदाजाकडे परत पाठविणे Back to the bowler त्यावेळच्या फलंदाजाला मानवत नसे. ते काम आघाडीच्या जोडीचे असे" आपल्यावरोबर खेळत असलेल्या श्री. नायडू, श्री. पी. विठ्ठल, श्री देवधर इत्यादिकांची उदाहरणे त्यांनी दिली. कारणे विचारली तेव्हा ते हंसून म्हणाले, "आजच्या खेळाडूना वेळ घालवावयाची बरीच साधने उपलब्ध आहेत. सिनेमा, पत्ते, गप्पा वगैरे इतर करमणुकीची साधने अलीकडे बरीच वाढली आहेत. आमच्या वेळी ऑफिस सुटले की आमचे पाय खेळाच्या मैदानाकडे वळत व तेथेच ते रमून जात. शनिवार–रविवारच्या साध्या सामन्याकडे आमचे लक्ष असे. कधी कधी मध्यरात्री उठून बाहेर पाऊस पडतो की काय हे आम्ही पाहात होतो. नजर आकाशाकडे असे. पाऊस पडला तर उद्याचा खेळ होणार नाही म्हणून चुटपुट लागत असे. कधी कधी पावसाचा राग येई. त्यावेळी हे शनिवार–रविवार व रजेच्या दिवशी होणारे सामने हेच वेळ घालविण्याचे प्रमुख साधन होते. पाऊस पडून सामना कधी रद्द होतो व सिनेमा-शाला कसे जाता येईल असे आताच्या सारखे त्यावेळी आम्हास वाटत नव्हते." त्यांचे हे उद्गार विचार करण्यासारखे आहेत यात शंका नाही. ●●●



## गोपालकृष्ण मोबें क

**कसलें गा गीत**
**गायलें तुवें**
**तारोच तोडीत**
**वीणेच्यो !**
**कसली गा चीज**
**आळयली**
**प्रसाद वांटीत**
**जीणेचो !**
**भजन तुजें**
**रंगलें भेस**
**प्राण पडले**
**देवा पांयार...**
**आमी मात**
**नागवले**
**काळजां आमचीं**
**रगता–वायाळ !**

**—र. वि. पंडित**




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

—सौ. विजया काळे






**बाळ** गेला ! बाळ गेला ! मला सोडून गेला कसा ? तिचा टाहो हृदयाच्या चिंधड्या उडवित होता ! तिचा हंबरडा ऐकून हृदयाचा ठाव सुटत होता ! शेजारपाजारच्या मुलीबाळींनी तर कानात बोटं घातली होती ! जीवाच्या आंकातानं केलेला आक्रोश ऐकवत नव्हता ! तिचा आक्रोश ऐकून गोठ्यातली गाईगुरं स्तब्ध झाली होती. एवढ्या मोठ्या वाड्याची कळा गेली होती !

मध्येच थांबून डोळे ताठ करीत, त्याच्या मृतदेहाकडे बघत ती विचारी तो गेला आहे हे खोटं आहे. भूक लागली म्हणून आता उठेल ! रडेल ! त्याची झोप अगदी कावळ्याची आहे ! बाजुला व्हा तुम्ही ! बाजुला व्हा! त्याचे चिमुकले गार गार पाय ती हातात धरी. त्याचे मुके घेई अन् बघता बघता खदखदून कढ यावेत अशी रडायला लागे. दुःखाचा आवेग तिला सहन होत नव्हता! पोटात भयंकर खड्डा पडला होता! आग आग होत होती! अन् ती जमिनीवर गडबडा लोळत होती ! घसा कोरडा पडून खोकल्याची ढांस लागली होती. लाल भडक डोळ्यातून रक्त ठिपकेल की काय अशी भीति वाटत होती!

क्षणभर कुठे गप्प झाली तोच समोरून गोठ्यातली गाय हंबरली. ती पुन्हा आक्रोश करू लागली. 'तान्हे बाळ गेलं! चार महिन्यांपूर्वी तुझी काळवड गेली ! तर रात्रभर मी बसून होते ! रात्रभर औषधपाणी केलं! डॉक्टर आणला! जनावराचं देखील मी मनानं वाकडं केलं नाही मग असं कां झालं? कां झालं असं?'

शेजारपाजारच्या बायकांनी तिला धरून ठेवलं होतं. चोळामोळा झालेला पदर सावरण्याचा, अस्ताव्यस्त झालेलं लुगडं सावरण्याचा त्या प्रयत्न करीत होत्या. तिला कशाचीच शुद्ध नव्हती. लहानशा चणीची, अशक्त, दुबळी अन् लाजरी तिची एवढीशी आकृती त्यांना आवरली जात नव्हती. पुन्हा पुन्हा त्या समजावीत होत्या 'असं करू नकोस! ऐक जरा ! सावध हो!'

ती त्यांच्याच अंगावर ओरडली! सावध हो काय! मी सावधच आहे. मला तुमचा डाव समजला आहे. चांगला समजला आहे! मी जीव देणार विहीरीत. बाळ नाही तिथे मी रहाणार नाही! सगळ्यांचे हात हिसडून दोन्ही सोपे ओलांडून ती विहीरीकडे धावायला लागली.

मावशीनी तिला गच्च धरली होती. 'घामावर वारा बसेल!' वात होईल तुला. ऐक जरा. पण तिची धडपड—तडफड कमी होत नव्हती. ती कुणाचंही ऐकायला तयार नव्हती. तोंडाची हाय हाय कमी होत नव्हती. कुणी तिचा घाम पुसत होतं. कुणी तिचे कपडे सावरत होतं. बाकीच्यांनी तिचा थरथरता देह धरून ठेवला होता. मग तिनेच अंगातली शक्ती खलास व्हावी. तसा स्वतःचं शरीर धाड्दिशी जमिनीवर टाकलं. घामानं चिंब झालेलं शरीर गार गार पडलं होतं. पोलक्याची बटणं सुटली होती. पदराचा पत्ता नव्हताच.

आईनं तिला जवळ घेण्याचा प्रयत्नं केला. मावशीनी थोपट-

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

**नारळ म्हणजे जीवच की तो! त्याला टांगून ठेवायचं!! अन् मग त्याला टांगणी लागली की त्याचा आत्मा तळतळतो. आपल्या सुटकेसाठी मग तो उदरी जीव घालतो असं म्हणतात.**

ण्याचा प्रयत्न केला. पण ती हातात रहातच नव्हती. कुठून तरी ती गप्प बसावी म्हणून मावशी प्रयत्न करीत होती. 'तुझ्या दुःखाला सीमा नाही हे खरं आहे. पण तुझ्या आक्रोशानं नवऱ्याची छाती फुटून जाईल. बायका रडून मोकळ्या होतात पण पुरुष मनातल्या मनात दुःख करतात! कुढतात. त्याच्याकडे बघ जरा!' तरी तिचं रडणं कमी होईना.

'मावशी तुझी जर माझ्यावर खरी खरी माया असेल तर मला विष दे! अन् ह्यातून माझी सुटका कर. विष दिलं नाहीस तर बाळाला मी इथून हलवू देणार नाही. माझ्या बाळाशिवाय मी जगणार नाही. अशी डोकं आपटून प्राण देईन!' डोळ्याचं पात लवतं न लवतं तोच तिने ताड्ताड् भिंतीवर डोकं आपटलं. कपाळाची एक बाजू हिरवी निळी झाली. मोठं थोरलं टेंगुळ उभारलं. भोवतालच्या बायका कळवळल्या. तिचं डोकं दाबून धरलं. सासूनं मात्रा उगाळून आणली आणि तिच्या जीभेवर चोळली. पण ती गिळण्याऐवजी तिने भडभडून उलटीच केली.

बाळ गेल्याचं दुःख बाजुलाच राहिलं अन् हिला कसं गप्प करावं. कसं समजवावं यातून कसं वाचवावं हे नवऱ्याला, सासूला, आईला, मावशीला समजेचना. हिच्या डोक्यावर परिणाम होऊन ही वेडी तर होणार नाही ना? जीव तर देणार नाही ना? म्हणून त्याना विलक्षण भीति वाटत होती. तिला आवरणं अशक्य झालं होतं.

तिची म्हातारी आई हातपाय मोडल्यागत बसली होती. दुःखानं तडफडणाऱ्या आपल्या मुलीचे केस मागे सारीत होती. "काय करायचं बाई! जे आपल्या हातात नाही त्याबद्दल कितीही आक्रोश केला तरी ते परत थोडचं येणार आहे?"

"पण तो गेलाच नाही! कसा जाईल तो? पाच मिनिटं त्याला विसंबले नाही! शेजारीपाजारी, कुणाजवळ सांभाळायला दिला नाही. गडी माणसं भरल्या पायानी शेतावरून, रानावनातून येतात म्हणून हातपाय धुतल्याखेरीज त्याना कधी घरात डोकावू दिलं नाही. तिन्हीसांजेला बाहेरचा वारा लागू दिला नाही. का लिंबाच्या झाडाखालून कधी नेलं नाही. डाव्या पायाचा अंगारा लावल्याखेरीज कधी गावची वेस ओलांडली नाही! रोज फुलानी दृष्ट उतरवीत होते. झोपेत देखील त्याला वाचपून पहात असे, इतकं त्याला जीवाचा कोट करून मी जपलं, संभाळलं! मग असा कसा जाईल तो?" आई कळवळली "कसा जाईल? ते कोडं सुटलय् का कुणाला! पण गेला ना! नाहीसा झाला ना."

ती हृदयभेदक ओरडली 'नाही गेला! जाणार नाही तो. काहीतरी तुमचा भ्रम आहे. रात्री त्याच्या नाकावर केशर घातले होतं. अजून त्यानं माझी बोटं रंगलेली आहेत. टाळूला ताज्या वेखंडाचा अजून वास येतो आहे. अन् काल तर ह्यावेळी घरभर रांगत होता. ओटीयरून त्याचे हुंकार ऐकायला येताहेत! पदराआडून माझ्याकडे बघून अजून हसतो आहे. मी डोळे मोठे केले तर लगेच ओठ काढले बघ मावशी! डाळिंबी रेशमी रुमाल अन् पांढरा फ्रॉक घालून पलीकडच्या खोलीत खेळतो आहे. हत्ती, घोडे, मोटारी बोळकी त्याने मांडली आहेत. ती देखील तो खेळायला यायची वाट बघताहेत? तो आला नाही तर निर्जीव खेळणीदेखील टाहो फोडून रडायला लागतील, तो आला नाही तर? तो आला नाही तर——"

पुन्हा तिचं बेसुमार रडणं सुरू झालं. हृदय चिरून टाकणारा टाहो ऐकवत नव्हता. तटस्थ होऊन माणसं उभी होती.

प्रत्येकजण तिचं दुःख जाणून होता! याबाबतीतल्या तिच्या भावना जाणून होता. तिच्या आईला आठवत होतं. लहानपणापासून तिला लहान मुलांचं वेड फार! उरापोटावर दुसऱ्याची मुलं संभाळली. शेंबडचालेंबडया पोरांची किळस केली नाही. त्याना कडेखांद्यावर घेऊन नाचवलं. भरवलं. आंघोळी घातल्या. लग्न झाल्यानंतर मात्र दहा वर्षं उलटली अन् ती मुलासाठी तळमळत वाट पहात राहिली. जो कुणी सांगेल तो उपाय करून झाला! नवससायास झाले. कडकडीत उपास! गावाबाहेरच्या देवाला शंभर शंभर प्रदक्षिणा! काटे बोचले. दगड रुतले. पायाची चाळण झाली. पण निष्ठेनं तिनं सर्व तसंच चालू ठेवलं. शहरात जाऊन मोठमोठे डॉक्टर झाले, वैद्य झाले. पाण्यासारखा पैसा खर्च झाला. अन् एक दिवस खरंच ह्या प्रयत्नाना यश आलं. बाळाच्या आगमनाची चाहूल. अत्यानंदानं ती वेडावून गेली.

तिचा जीव क्षणोक्षणी टांगून रहात होता. काहीतरी निमित्ताला कारण होईल अन् सगळं फिस्कटेल. ती स्वतःला नको इतकं जपत होती. जिन्याची पायरी उतरायची नाही. लहानसं भांडंदेखील उचलायचं नाही. डॉक्टर, औषधपाणी, पथ्यपाणी ह्याला तर सुमारच नव्हता.

एकेक दिवस ती मोजीत होती. नऊ महिने जीवापाड तो ठेवा जपला होता. संभाळला होता. सुटकेचा दिवस आला. सकाळपासून वेदना अन् कळा येत होत्या. नवऱ्यानं तिला प्रसूतिगृहात नेले. पुन्हा कळा थांबल्या. मग सारखी तपासणी अन् इंजेक्शनांचा भडीमार सुरू झाला! टोचून टोचून एक हात बधिर झाला. दंडात ग्लुकोज् टोचलं जातच होतं. अन् दोन दिवस पाय वरती टांगून ठेवावे लागले होते. पण त्याही अवस्थेत तिने डोळ्यातून पाणी काढलं नाही की विश्वास सोडला नाही. बाकीचीच काळजी करीत होती पण ती अगदी शांत होती! एकच ध्येय! एकच निश्चय! येणाऱ्या बाळाचं सुख! त्याची सुरक्षिततेसाठी तिने स्वतःचा प्राण पणाला लावला होता.

तिचा निश्चय बघून, तिचा सोशीकपणा बघून त्या तुसड्या नर्सलादेखील पाझर फुटला होता. तिनं कबूल केलं. कुठल्या जातीची ही बाई आहे कुणास ठाऊक! आतापर्यंत शेकडो बाळं-




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तीनी पाहिल्या. पण हिच्यासारखी सोशीक हीच! मरणाच्या दारात उभी आहे. अन्नाचा कण नाही पोटात दोन दिवस! पण हुस्स् देखील करीत नाही. मग तिच्या थरथरत्या मांड्या पकडीत, स्थिर करीत नर्स पुन्हा पुन्हा आग्रह करीत होती 'चहा तरी घे थोडा गरम!' ती पुन्हा म्हणे "चहा नको, पाणी नको, पण सिस्टर खरं, खरं सांगा मूल सुरक्षित आहे ना? सुरक्षित राहील ना?"

नर्स हसली. तिला समजावीत राहिली. "राहील, राहील! मूल सुरक्षितच आहे. काही काळजी करू नकोस! तू अशक्त आहेस म्हणून नाहीतर डॉक्टरनी चिमटे काढून मूल काढून घेतलं असतं! पण टाके पडतील! तुला त्या वेदना सहन होणार नाहीत! म्हणून—" ती कळवळली "मला वाटेल तितका त्रास होऊ दे! मी सहन करीन! मला सहन होईल हो! मी काही अशक्त नाही! सहन करण्याची ताकद आहे माझ्या अंगात ! पण त्याच्या केसालाही धक्का न लागला पाहिजे! त्याच्या जीवाला एवढाही अपाय न झाला पाहिजे!"

मोठ्या प्रयासानं दोन दिवसानी तिची सुटका झाली. दोन जीव सुखरूपपणे अलग झाले. नऊ महिने उरी बाळगलेलं ते स्वप्न, हजार वेळा मनासमोर कल्पनेनं उभी केलेली ती मूर्ति! पांढऱ्या कपड्यात गुंडाळून ठेवलेला तो एवढासा जीव बघून स्वतःच्या भाग्याचा राहून राहून तिला विस्मय वाटत होता. आश्चर्य वाटत होतं.

तिची आई हे सगळं आठवत होती. अन् तोंड दाबून रडत होती. दुःखानं उन्मळून पडलेली तिची नाजुक मुलगी ग्लानीनं काही वेळ निपचित पडली होती. सतरंजीवर पालथी, अस्ताव्यस्त प्राण गेल्यासारखी पडली होती. अन् आई स्वतःचं मन आवरून तिच्या गार गार पडणाऱ्या हातापायाना सुंठ चोळीत होती. तिला सावरण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होती.

बाळंतपण झालं! खूप हाल झाले. पण तेवढ्यानेही तिची सुटका झाली नाही. पुन्हा तिच्या सहनशीलतेची कसोटी लागली.

एप्रिल फूलचा पहिला बळी



महाराष्ट्र सरकारने मोरारजींच्या जन्मदिवशी दारुबंदी सैल केली.

अनावर पान्हा पण तो वाहीना. मुलाला पिता येईना. ते अशक्त मूल ते ओढूच शकेना! भूक लागली की ते तळमळून रडत राही पण एकही थेंब त्याच्या पोटात जाईना! दगडासारखे घट्ट, टणक झालेले अवयव! असह्य कळा, असह्य वेदना! त्याचंही तिला काही वाटत नव्हतं. पण मुलाचे हाल बघून ती ढसढसा रडत होती. भुकेनं कासावीस झालेला तो कोवळा जीव तिच्या पोटात पीळ पाडत होता. काळजीनं तिला हैराण करीत होता. त्याच्यासाठी वाटेल ते दिव्य करायला ती तयार झाली होती.

शेवटी ब्रेस्ट-पंपचा उपयोग करावा लागला. पुन्हा वेदना! मनस्वी बसणारी ओढ! दुसरं मरणच! शेवटी रक्ताचे थेंब ठिपकायला लागले. तेव्हा ओघ सुरू झाला. त्यावेळीही ती रडली नाही की विरोध केला नाही. तिची एकच काळजी भुकेपायी त्याला असा त्रास झाला तर तो अशक्त नाही ना होणार? त्याला घेऊन ती घरी आली. रात्रंदिवस बाळाचा ध्यास! लहान मुलाच्या हातात एकादं चकचकीत सुंदर खेळणं मिळावं अन् अपूर्वाईनं त्यानं त्याला न्याहाळावं हाताळावं, सारखं जवळ घेऊन बसावं! अशी तिची अवस्था झाली होती. कधी मधे त्याला सर्दी पडसं होई अन् मग तिचा जीव काळजीनं थरकून जाई. असा एकादा दिवस सोडल्यास बाकीचे दिवस एकाद्या सुंदर स्वप्नासारखे भासत होते! पूर्वी रेंगाळणाऱ्या, नको जीव करणाऱ्या दिवसाना कसले पंख फुटले होते कुणास ठाऊक! बाळापायी रात्रीचा अन् दिवसाचा मेळ बसत नव्हता. त्याचीच सेवा! त्याचाच राग लोभ! त्याचं सुख! त्याचं कौतुक. बस्स! तिचं सगळं जग त्यानेच व्यापून टाकलं होतं अन् आज ध्यानी मनी नसताना काही तासात त्याची प्रकृती बिघडली अन्....

सगळं आठवून आईला पुन्हा पुन्हा रडू कोसळत होतं! तिच्या अंगावरून डोक्यावरून ती हात फिरवीत होती पण पुन्हा पालथ्या निजलेल्या तिच्या शरीराला गदगदून कढ फुटले. सगळं अंग गदगदायला लागले. तिची झापड उडाली होती. ग्लानी उडाली होती.

"बाळ! बाळ" म्हणून किंचाळत ती ताड्दिशी उठून बसली. अंगालगतचा कपडा दुधानं भिजून चिंब झाला होता! थबथबत होता! अनावर पान्हा! न झेपेल इतका! न सोसवेल इतका! ते दृश्य मावशीला बघवेना 'एकेकाचं नशीब! चार महिन्याची पोरंदेखील आईच्या दुधाशिवाय झुरतात! अन् इथं हा आठ महिन्याचा झाला तरी वरचा थेंब घालावा लागत नव्हता. पण सगळं संपलं! एकाएकी संपलं! आता त्याचा काय उपयोग? असा त्रास झाला तर हिचं कसं होईल? कसे दिवस निघतील? नाहीतर वेडी होईल अशानं.'

समोरून तिने दारापाशी जमलेली गर्दी बघितली अन् ती खवळली. खोलीचं दार अडवून कडी गच्च धरून उभी राहिली. "या कुणाला यायचं आहे ते माझ्यासमोर! एकेकाच्या गळ्याचा घोट घेईन! हात लावून बघा त्याला!" बाळाला न्यायला आलेले लोक दारापाशीच घुटमळत राहिले. आत यायला कुणी धजेना!




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दुःखानं बेफाम, बेभान झालेली ती गरगरा डोळे फिरवीत रडत दारात आडवी झाली होती!

मावशीनं तिला आवरण्याचा प्रयत्न चालविला. तिच्या पाठीवरून ती हात फिरवीत राहिली. "ऐकतेस माझं! शांत हो! क्षणभर तोंड मिट! ती चवताळली 'कशी तोंड मिटू? कसं सहन करू? हे दुःख जनावरदेखील सहन करत नाही! माझ्या तांबड्या गायीची कालवड मेली तर चार दिवस हंबरत होती. तोंडी फेस येईतो! चाऱ्याला, पाण्याला तोंड लावीना! मग मी तर माणूस आहे. मी तर माणूस आहे. . .

"माणूस आहे म्हणूनच म्हणते! माणसाला विचार असतो! शहाणपणा असतो! डोकं असतं! मन केव्हा आवरायचं ते समजायला पाहिजे! ते समजतं, ते आवरण्याची शक्ती असते म्हणूनच तो माणूस असतो. म्हणूनच माणसात जनावरात फरक असतो!"

ती मावशीचा एकही शब्द खाली पडू देत नव्हती. मावशीही चिकाटीनं तिची समजूत घालीतच होती. 'पण चार दिवसानी तरी हंबरायची थांबली ना! चाऱ्याला, पाण्याला तोंड लावलं ना! देहधर्म कुठं सुटलाय्! दोन महिन्यात पलीकडच्या वाडीतलं वळू आणून लावलं तरी–एवढंच कशाला! कृष्णाताईच्या म्हातारपणी नवरा गेला अन् पाठोपाठ दोन्ही मुलगे गेले वर्षाच्या अंतराने! एक मुलगी राहिली मागे, पण मुलीसाठी पुन्हा कंबर बांधून, मन घट्ट करून उभी राहिली. तिचं लग्न केलं, बाळंतपण केले.

'मावशी कृष्णाताईच्या जीवाला मागे कुणीतरी होतं! मला कोण आहे बाळाच्या जागी? मी कुणाकडे पाहून दुःख विसरू? त्याला विसरू! सांग!'

मावशीनं तिचा पदर सारखा केला 'पण तुझं वय आहे अजून!' अजून 'होतं' आहे. आशेला जागा आहे! दुसरं मूल—

तिने जोराने मान हलवली. मावशीचा हात हिसकला. उगीच काही तरी मला सांगून गप्प करू नकोस! तू काही म्हणालीस तरी मी हा आक्रोश थांबवणार नाही. घसा फुटेतो ओरडेन! जीव जाईतो ओरडेन! माझा आक्रोश आकाशाची कवाडं फोडून देवाच्या कानावर जाईल! त्याला करुणा येईल माझी! तो मला भीक घालील! माझा बाळ परत देईल!

मावशीनी मोठा सुस्कारा सोडला 'अग अशा आक्रोशाला देव भीक घालत असता, भीत असता तर सगळेच अमर झाले असते! एकदा गेलेला प्राण कुडीत कसा येईल वेडे! विचार कर जरा. शुद्धीवर ये! फार आक्रोश म्हणजे आत्रस्ताळेपणा म्हणतात. लोक नांव ठेवतात. ह्या प्रसंगीदेखील लाजलज्जा धरावी लागते. वेडेपणा करू नकोस! ऐक माझं मी काय म्हणते ते!'

ती पुन्हा चवताळली 'तुझं काय ऐकू मी? माझ्या जागी तू असतीस तर काय केलं असतंस? हे दुःख समजायचं नाही तुला! छातीत आग होतीय्! पोटात आग भडकलीय् माझ्या!'

तिला गप्प बसवता बसवता मावशीलाच ठसठसून रडू आलं. 'अगी आज काय तू वेडी झालीस! तुझ्याच आईकडे बाळंतपणासाठी आले होते! पहिल्याच वेळी बाजेवरच गेलं. पुढे देवीच्या साथीत एकजण गेला. लहानसहान नाही! मुंज झालेला! खूप वैराग्य आलं होतं त्यावेळी. पण पुन्हा देवानी चांगले दिवस दाखवले ना! सगळं विसरले. पुढच्यात रमले! म्हणून म्हणते मी काय म्हणते ते ऐकून घे! तोंड मीट जरा. एक क्षणभर तरी!'

ती उरी फुटून आणखीनच रडायला लागली. त्याला मी सोडायला पाहिजे हेच ऐकायचना तुझं! नाही! नाही! नाही! मी ऐकणार नाही कुणाचं! तू देखील शेवटी माझ्यावर उलटलीस ना?'

'उलटेन कशी बाई! तळहाताच्या फोडासारखं लहानपणापासून तुला सांभाळलं! मग उलटेन कशी! तुझ्या सुखासाठी माझी धडपड आहे. तुला बाळाबद्दल वाटते. आम्हाला तुझ्याबद्दल वाटतं. तुझं जीव पाखडणं व्यर्थ आहे. त्याचा उपयोग असता तर तुझी आई मी वाटेल ते दिव्य करायला तयार झालो नसतो का? काहीतरी दुसरा मार्ग काढू!'

'कसचा आला आहे दुसरा मार्ग! त्याचे प्राण परत दिले नाही तर त्याचं शरीर मी सोडणार नाही. त्याला न्यायचं तर माझा प्राण आधी घ्यावा लागेल! जिथे तो तिथे मी!'

मावशीनी तिला छातीशी धरलं! माझं ऐक! मोठ्या माणसाचा अनुभव असतो एकेक! तो तर ऐक! नुसती हाय हाय करू नकोस! असा वेडा हट्ट काय उपयोगी आहे. असं झालं तर दुसरं लवकर होतं म्हणतात! तो दिवस आला तर तू सारं विसरशील. दुसऱ्यात रमशील! निष्प्राण देहाला कवटाळून काय मिळणार आहे? विचार कर जरा! शहाणी हो!'

'काहीतरी समजूत घालू नकोस माझी! इतरांची गोष्ट वेगळी माझी गोष्ट वेगळी! दुसरं कसलं होणार आहे मला? हे होता होता दहा वर्षं गेली. अग्निदिव्य करायला लागलं तेव्हा हे दृष्टीला पडलं. मावशी किती छळ झाला माझा! किती यातना, वेदना, जिवंतपणी मरण भोगलं आहे मी! अन् आता पुन्हा कसलं होणार! माझ्या नशिबी नाहीच ते! मीच दुर्दैवी, दुष्ट, हतभागी.' स्वतःच्या तोंडात तिने मारून घेतल्या. पण तिचा आवाज जरा खाली आला होता. मावशी काय म्हणत होती ते तिच्या कानात शिरत तरी होतं!


सुग्रास भोजन, गरमागरम व चविष्ट उपाहार
यासाठी दादर भागातील सुप्रसिद्ध–

**छाया रेस्टॉरन्ट ॲण्ड कन्फेक्शनरी**

डॉ. डी'सिल्वा रोड, दादर (पश्चिम रेल्वे),
मुंबई–२८. (फोन : ४५१६३०)

B.Y.P.







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मावशीनी आपले म्हणणं पुढे रेटलं. तिचे हात बाजूला केले. कळवळून गालावरून हात फिरवला 'वेडी अगदी वेडी! तू भोगलेस ते आम्हाला सगळ्यांना माहित का नाही! पण त्यावेळी होतच नव्हतं! आता 'होती' वाट आहे. पहिल्यानं चढ वयात मूल झालं तरी मग वर्षात पाळणा हललेला मी बघितला आहे. अनेकांची उदाहरणं आहेत! तुझ्या काकूचं पाहिलंस! आतेचं पाहिलंस! उशीरा मूल झालं तरी आता गोकुळासारखं घर भरलंय्! नको म्हणायची पाळी आलीय्! प्रत्येक बारशाच्या वेळेस मिरवलीस तरी लक्षात नाही तुझ्या! इतरांचं बघूनच आपल्याबद्दल विचार करायला हवा! मन घट्ट करायला हवं! शहाणपणा धरायला हवा!' तिचे हुंदके देणं चालूच होतं. मावशी तिच्या केसावरून हात फिरवीत होती. पाठीवरून हात फिरवीत होती. शेजारपाजारच्या बायका चुळबुळत होत्या. पण तिच्यापुढे बोलण्याचा कुणाला धीर होत नव्हता. मावशी तिच्या कानापाशी हलकेच म्हणाली 'उठतेस! आत येतेस!' तिने मान हलवली 'मी जगणारच नाही'.

"असं सगळीच जण म्हणतात! पुन्हा उठतात! आशेवर जगतात! चांगले दिवस आले की सगळं विसरून जातात! पूर्वीच्या दुःखाची नांवनिशाणीदेखील उरत नाही! देवाचा हा खेळ आहे. हसण्यात रडवायचं! रडण्यात हंसवायचं! त्याच्या राज्यात तसंच रहावं लागतं! पदर पसरून बसायचं. जे मिळेल दान ते घ्यायचं!"

हुंदक्यांनी तिचं शरीर गदगदत होत पण त्वेष कमी झाला होता! आक्रोश कमी झाला होता.

तिचा कल पाहून मावशी पुन्हा समजूत घालू लागली. आपलं म्हणणं हलके हलके तिला पटवू लागली 'माझं ऐकून घे! प्राण दिलास तरी गेलेलं परत येणार नाही! मघापासून बायका चुळबुळताहेत! एक तोडगा करण्यासाठी! तुझ्या पुढच्या सुखासाठी! आतां पुढचं बघायला हवं! तुझा वंश! तुझ्या घराण्याचा दिवा! म्हणून म्हणते! . . .'

ती काही बोलत नव्हती. घसा कोरडा पडला होता. ठसका लागला होता. मावशीनी बळं बळं तिला पाणी पाजलं. कोरडचा ओठावरून पाणी फिरवलं 'हूं! उठ माझी बाई! बाळ घरात असेपर्यंत हे सगळं करायला पाहिजे! आम्हाला तरी यात सुख वाटत आहे का! सुचत आहे का! पण तुझ्यासाठी, तुझ्या घरासाठी आम्ही छातीवर दगड ठेवलाय्! प्रत्येकाला ठेवायला लागतो!'

तिने मावशीच्या खांद्यावर मान टाकली 'काय करू मी! माझ्यावर कां ग असा प्रसंग आला? मला जगायची इच्छा नाही! कशाचीच इच्छा नाही.'

मावशीच्या पोटात तुटत होतं. तिची स्थिती बघवत नव्हती. आवाज गदगदला होता 'तुझ्यावर प्रसंग तोच आमच्यावरही आहे. तू आणि आम्ही वेगळया आहोत? स्मशानवैराग्य येतं अशावेळी पण मन आवरावं लागतं. पुढची आशा कुणाला सुटलीय्! पुढच्या सुखासाठी राक्षस बनावं लागतं! वेळ गेली म्हणजे पस्तावशील! म्हणून जरा घरात चल म्हणते!'

ती खिळून एका जागीच बसली होती. कडीला गच्च धरलेला हात खाली आला होता. रडणं थांबलं होतं.

भोवतालच्या तटस्थ बसलेल्या दोनचार जणी पुढं झाल्या! त्यांनी तिला बळंच उठवलं. थंडीनं हुडहुडी भरावी अशी तिची दातखिळी वाजत होती. उभी राहिलेली ती पुन्हा मटकन् खाली बसली. 'नको ग नको! माझे पाय गेलेत! मला चालवत नाही! पाऊल टाकवत नाही.'

"असं करू नका! वेळ गेली म्हणजे रडाल बरं! आमच्या अंगावर तुमचा भार टाका! आतल्या अंगाला चला!" शेजारणी कुजबुजल्यासारखं बोलत होत्या.

मावशीनं नेटानं तिला पुन्हा उभी केली. तिचा पदर सावरला! लुगडं सारखं केलं! मावशीच्या खांद्यावर तिने मान टाकली. आणि तसंच दोन चार जणींनी मिळून तिला आतल्या बाजूला नेलं. हुंदक्यांनी छाती धपापत होती! घामानं भिजलेले कपडे अंगाला घट्ट चिकटले होते! केस अस्ताव्यस्त झाले होते.

तिला बघून कुणीतरी पाट मांडला! ती काही केल्या त्यावर बसेना! पुन्हा तिला रडू फुटलं, कढ आले. मावशीनी पुन्हा आर्जवं केली. 'नको असं करूस! वेळ नको घालवूस! छातीवर दगड ठेव! दुसऱ्या जीवासाठी ठेवायला हवा! माझी शप्पथ आहे तुला!'

तिला बळंच पाटावर बसवलं. जमलेल्या बायकांची घरात कुजबुज—वावपळ सुरू झाली.

कुणीतरी ओटीचे सामान पुढे आणले. तिच्या कपाळाला भलामोठा कुंकवाचा टिळा लावला. पायावर कुंकवानं रेघ ओढली. हाताला चंदनाची उटी लावली. सुटलेले केस कसेबसे गुंडाळून त्यात फुलाचा गजरा माळला! अन् दोघी तिघीनी तिचे बळंच हात धरून पदर पसरायला लावला. अन् पदरात ओटी घातली.

विलक्षण गतीनं, विचित्र स्तब्धतेनं, भारल्यासारखी, झपाटल्यासारखी, मुकी होऊन भोवतालची माणसं वावरत होती!

ती ताठ डोळे करून कुठे तरी बघत होती. भावनाशून्य! संवेदनाशून्य होऊन!

ओटीचा नारळ मावशीनं कोऱ्या कपड्यात गुंडाळला अन् समोर खुंटीला टांगून ठेवला. तिला सांगत होती चार महिन्यात आता दिवस राहिलेच पाहिजेत! आतापर्यंत कैक जणींना अनुभव आहे हा! गुदस्ता नमूताईचं ऐकलंस ना! चार वर्षांसाठी पार्वतीचं पाहिलंस ना! दिवस राहल्याखेरीज ह्या नारळाला इथून काढायचं नाही! टांगून ठेवायचं! नारळ म्हणजे जीवच तो! त्याला टांगणं लागली की त्याचा आत्मा तळतळतो! आपल्या सुटकेसाठी मग तो उदरी जीव घालतो—







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



करपाशी ह्या तनूला...
बांधुनि करि शिक्षेला...

# प्रीत पिउनिया मीहि रिती

**एरॉल फ्लिन**
**आणि**
**नोरा ॲडिंग्टन**
**यांची अशी ही एक**
**प्रेमकथा(च)**

**हॉलिवुडला** परत आल्यानंतर नोरा ही इरॉलची खाजगी कारभारी व फावल्या वेळची प्रेयसी अशा दुहेरी भूमिका वठवू लागली. त्या कारभाराबद्दल तिला तसा आर्थिक लाभ फारसा होत नसे. कारण तिचा सारा खर्च इरॉलच चालवीत असे. त्याचे मोल व तिला लाभणाऱ्या प्रीतीच्या क्षणांचे मोल पगाराच्या किरकोळ रकमेत होण्यासारखे नव्हते. "लाडके, तुझ्यावर माझे फार प्रेम आहे" हे शब्द तिच्या दृष्टीने फार मौलिक होते.

एक दिवस इरॉल तिला म्हणाला, "माझ्याकडे पाहिल्यानंतर कधी तुझ्या मनात विचार येतो काय ग की मी सैन्यात कां गेलो नाही?"

"छे: बाई, मी तसा कधी विचारच केला नाही."

"मी सांगू? मला हृदयाचा विकार आहे. कधी कधी हृदय खूप जोराने धडधडू लागते. दुखणं तसं गंभीर नाही. पण कोणत्या क्षणी काय होईल ह्याचा भरवसा देता येत नाही".

"ऐकून मला तुझी फार काळजी वाटते."

"कधी कधी सैनिकाच्या जीवनाचा, लढायांचा मला खूप मोह पडतो. वाटतं तिकडे धावत जावं. पण अखेर आम्ही सिनेमातल्याच लढाया लढत राहाणारसं दिसतंय!"

एक दिवस 'अलास्का'ला सैनिकांच्या मनरंजनासाठी चारपाच कलावंतांची तुकडी घेऊन आपण जाणार असल्याचे इरॉलने नोराला सांगितलं. "अन्सर्टन स्टोरी" त्याने नुकतेच पूर्ण केले होते. "एस्किमोंच्या त्या देशातल्या स्त्रियांचा मत्सर वाटण्याचे मला काही कारण नाही." नोरा मुद्दामच म्हणाली.

"कां बरं? तुला त्यांची काय माहिती आहे?"

निवेदक – प्रभाकर अत्रे




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

"मला वरोबर आणायचं आणि मग दुसऱ्या बायांच्या मागावर असं हिंडायचं हा काय प्रकार आहे?" नोरा त्याला म्हणाली.

त्याने भोवतीचे निसर्गदृश्यच जणु आपण पहात आहोत असे भासवीत विचारले, "कुठली बाई?"

"मी जेव्हा दोघांचं म्हणून गणित मांडते ना तेव्हा उत्तर एकच आणि वरोबर येतं – सांगू काय ते? इरॉल फ्लिन् आणि कुणीतरी स्त्री!"

"एक तर तुझं गणित तरी फार कच्चं असलं पाहिजे किंवा काहीतरी लादण्याचा तरी हा प्रयत्न असला पाहिजे."

"लादल्यासारखं आहे खरं! खरं म्हणजे तूच लादल्यासारखा झाला आहेस."

इरॉल अस्वस्थ झाला. घाईघाईने त्याने बर्फाचे काही खडे खोदून काढले.

"तुझे धैर्य होईल मला ते मारायचं?"

"तुला काय वाटतं? मी मारणार नाही?"

"होय! निदान मला तरी तसं वाटतं"

पण मनात भीति होती. "कदाचित् मारेलही" असा विचार करीत नोरा दूर पळण्याच्या विचारात होती. पण त्या बर्फावरून पळून जाणेही तिला कठिण होते.

"मग एक कर. यापुढे दुसऱ्या स्त्रियांच्याबद्दल असलं कुजकं नासकं बोलणं बंद कर! वचन दे तसं."

नोराने वचन दिले.

इरॉलला सकाळी कमी बोलणे पसंत असे. त्याची ती पद्धत नोराला आवडत असे. चित्रपटाच्या कामापलिकडे इतर वेळी कार्यक्रमानुसार आयुष्य काढण्याची कल्पना इरॉलला अजिबात पसंत नसे. एकदा नोरा त्याला म्हणाली "तुझ्या दृष्टीने अगदी अयोग्य काम कुठले असेल सांगू? एखाद्या उतारू गाडीचा इंजिनियर होण्याचे. तुझ्या क्षणाक्षणाला बदलणाऱ्या मूडस्प्रमाणे जर गाडी चालवायचे ठरेल ना तर जेव्हा गाडी कॅन्सस शहरी अपेक्षित असेल तेव्हा ती कुठे

## नवरसमंजरी–

( आचार्य प्र. के. अत्रे यांची क्षमा मागून )

### शृंगाररस–



**भाळी लावित लाल कुंकुम चिरी, ती तंग चोळी उरी।**
**वाक्या शोभवि ते भुजद्वय तिचे, ती कृष्ण काया जरी॥**
**नाकी नीटस आणि रेखिव अशी, पाहून घाटोण ती।**
**तेथे तो बघ प्रेमवीरहि कुणी, मारीत 'लाईन' ती ॥ १॥**
**घाली शीळ अशी बघोनि तिजला, गाली हसे तो सदा।**
**त्याचा तो बघुनीहि लोचटपणा, वैतागली एकदा॥**
**क्रोधे घट्ट धरूनि मग्नट वदे, रे!! सोडवीशी जरी।**
**मी होईन तुझीच बाइल 'मढ्या'! ना बोल आई तरी!॥ २॥**
**झाला गर्भगळीत घाम फुटला, त्या प्रेमवीरासही।**
**ना हो धीरहि द्यावयासहि तिच्या, डोळाहि डोळ्यासही॥**
**बोले जाइ निघोनि नीट 'मुडद्या'!! तो हात झाडोनिही।**
**सोडी आज परी पुन्हा गवसशी, मोडीन पेकाडही! ॥ ३॥**

**–पंडित महाजन**

मिनिअॅपेलिस स्टेशनात शिरताना दिसायची!" इरॉल खाण्यापिण्यात फार चोखंदळ होता. नोराला स्वयंपाक येत होता. पण इरॉलकडे आल्यावर त्याला फार महत्व प्राप्त झाले. पेंटिंगबद्दलचीच चोखंदळ वृत्ती इरॉल खाण्याबाबतही दाखवी. नुसते मांस आणि बटाटे खाणाऱ्यांची तो टिंगल करीत असे. त्यांना तो प्रतिगामी म्हणत असे. ह्याला विविध प्रकारच्या मद्याचा शौक होता. सकाळच्या फराळाआधी भरपूर पोहणे हा त्याचा आवडता छंद होता. पोहण्यामुळे सपाटून भूक लागायची त्याला. एखाद्या अघाशासारखा तो अन्नावर तुटून पडे. अखंड धूम्रपान आणि मद्यपान ही त्याची सवय होती. त्याला एक सवय जडली होती. पहाटे चारच्या सुमाराला त्याच्या तोंडाला भयंकर कोरड पडत असे. मग धडपडत तो जागा होई आणि नोराला म्हणे, "जरा बिअर दे ग."

अर्धमिटल्या डोळ्यांनी मग ती धडपडत स्वयंपाक घरात जाई आणि त्याला बिअरची बाटली आणून देई. पुढे पुढे मग ती अंथरुणाशेजारीच एक बर्फपेटी ठेवू लागली. कपडे घालायला काढायला त्याला नोरा किंवा अलेक्सची मदत लागत असे. टापटीप त्याला आवडे. हॅट्स वापरण्याबद्दल त्याला फार घृणा होती. जास्तीत जास्त वारे डोक्याला लागले पाहिजे ह्याबद्दल त्याचा कटाक्ष होता. टक्कलाची त्याला फार भीति वाटे.

त्याला स्वतःच्या घराचा फार अभिमान होता. त्याचे घर म्हणजे जणु एक किल्लाच होता. फक्त येणाऱ्या जाणाऱ्याला हटकणारे रखवालदार वा द्वारपाल तिथे नसत. त्याला माणसांकडे जाऊन गप्पा मारणे आवडत नसे. पण लोकांनी आपल्या घरी येऊन तासन्तास गप्पा मारल्या, मद्यपान केले तरी त्याला चालत असे. तीच त्याची आवड होती. तो कामाव्यतिरिक्त घरीच राहणे पत्करीत असे. म्हणे, "मला इथून बाहेर जायची मुळी गरजच काय? हवे ते सारे इथे आहे. अन्न, मद्य, टेनिसकोर्ट, पोहण्याचा तलाव,







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"ती माणसे कधी आंघोळ करीत नाहीत हे मला चांगले ठाऊक आहे. आणि तू किती चोखंदळ आहेस तेही मला ठाऊक आहे."

"तुझी भाषा सुधारल्यासारखी वाटते आहे."

"नुसती भाषाच नाही. काही आणखी वरचसं काही" असं म्हणत नोराने त्याच्या जवळ जाऊन त्याचे चुंबन घेतले.

"बरोबर!!" इरॉल म्हणाला.

"आणखी तू कां अलास्काला जातो आहेस तेही मला ठाऊक आहे."

"सांग बरं?"

"मला ख्रिसमसची काही भेट द्यावी लागणार नाही म्हणून!!"

"तुझ्यासाठी मी आंगठी कधीच निवडून ठेवली आहे. "टोपाझ रिंग" तो म्हणाला."

"अस्सं काय.?" असं म्हणत नोराने एक उशी उचलून ती त्याच्याकडे भिरकावण्याचा आव आणला.

"उशी नको. त्याऐवजी दुसऱ्या दोन गोष्टी फेक."

"कोणत्या दोन गोष्टी?"

"तुझे दोन कोमल हात."

नोराने आज्ञापालन केले. ते हात तिथे बराच वेळ रेंगाळले.

इरॉल अलास्काला निघून गेला. तेथे उतरताच त्याने पहिली तार केली. "एस्किमोंबद्दलचा तुझा अभिप्राय बरोबर होता."

तेथून येताना त्याने नोरासाठी रशियन अर्माइन कोट भेट म्हणून आणला होता.

"सुंदर! अप्रतिम!!" नोरा म्हणाली.

अलास्काच्या सफरीवरून परतल्यावर इरॉलने जे प्रेम दिले, त्यामुळे नोरा खूष झाली. तिने मनोमन ठरविले की इरॉलचे खरे प्रेम आपल्याला लाभले असताना, त्याच्याकडे येणाऱ्या इतर स्त्रियांचा मत्सर करायचा नाही. पण तिच्या त्या निश्चयाला तडे जावे तसेच प्रकार नंतर घडले. एक दिवस ती बाथरूमला जायला निघाली. बाथरूमचे दार आतून बंद होते. आणि एक पर्स बाहेर डोकावत होती.

जेवणे झाल्यावर नोरा त्याला म्हणाली, "तुझ्याकडे येणाऱ्या इतर मुलींचा यत्किंचितही मत्सर करायचा नाही असा मी मनोमन खूप प्रयत्न करते. पण—"

इरॉल तिला हसून म्हणाला "तू हवालदिल व्हावे असं खरं म्हणजे त्यात काही नाही. नवथर पोरी येतात हे खरे पण मला त्यांच्याशी वाईट वागता येत नाही. पण खरंच सांगतो, मी फक्त तुझ्यावर आणि तुझ्यावरच प्रेम करतो.

"तर मग असल्या पर्सेस बाथरुमच्या दारात यापुढे लटकत राहणार नाहीत ह्याची काळजी घे."

"असल्या बॅगसचा विचार तुझ्या माझ्या प्रीतीच्या आड येता कामा नये." इरॉल म्हणाला.

त्यानंतरच्या रविवारी त्याच्या विनंतीवरून नोरा त्याच्या घरी राहिली. रात्र फार आल्हादक होती. पण सकाळ—

सकाळी नोरा बाथरूममध्ये गेली. तोंड धुता धुता तिला फोनचा आवाज ऐकू येऊ लागला. नळ बारीक करून ती ऐकू लागली. इरॉल बोलत होता, "लाडके, तुझ्या फोनची मी वाटच पहात होतो सकाळपासून.......... ठीक ठीक..... संध्याकाळी भेटतो. छान. मला पिवळा पोषाख आवडतो. तुला तर तो फारच शोभून दिसतो."

नोराने आरशात पाहिले. तिला स्वतःचा चेहरा ओळखू आला नाही. ती बाथरूममधून बाहेर आली. इरॉल जणु काही घडलेच नाही ह्या थाटात तिला म्हणाला " चल लाडके, फराळ करून घेऊ या."

"लाडके हा शब्द स्वैरपणे माझ्याबाबतीत वापरू नका. फोन्ससाठी तो राखून ठेवा" नोरा फणकाऱ्याने म्हणाली.

"आमलेट घे. बरं वाटेल."

"अंडी पिवळाच बलक देतात नाही का? मला एकदम पिवळ्या रंगाची आठवण झाली. पिवळ्या पोषाखाचे स्मरण झाले. मला फराळ करायचा नाही."

"काय झालं नोरा?"

"काही नाही! मी दोन दिवस इथेच होते. आता घरी जाते." ती निघाली. निघताना ती म्हणाली, "आजची रात्र सुखासमाधानाची जाईल अशी मी आशा करते" त्या वाक्याला असलेली उपरोधाची धार तिलाच जाणवली.

ती मुलगी न्यू यॉर्कची एक मॉडेल गर्ल होती. तिला इरॉलचे वेड लागले होते. एकदा ती त्याच्या घरी जीव द्यायला निघाली तेव्हा इरॉलने तिला झटकून टाकले. पण ती इतकी भारावलेली होती की इरॉलच्या जवळपास तरी राहता यावे म्हणून ती 'अॅलेक्स' (इरॉलचा दोस्त, सेक्रेटरी) बरोबरच राहू, झोपू लागली. ★ ★

## आनंद–लग्नाचा (आणि घटस्फोटाचाही)

इरॉलला स्काइंग फार आवडत असे. नोराला मात्र त्यात फारसे कळत नसे. जमतही नसे. एकदा इरॉलच्या आग्रहावरून ती स्काइंगसाठी म्हणून गेली. परंतु पहिल्याच दिवशी खूप गारठली. इरॉलने तिला गरम पाण्याने आंघोळ घातली आणि मद्याने तिला मॉलिश केले. "बरं वाटतं ना?" असं म्हणत त्याने तिच्या ढुंगणावर एक चापटी मारली. स्काइंग ह्या विषयातला इरॉल हा जादुगार–किमयागार होता तर नोरा नवशिकी होती. स्वतःचा तोल सांभाळीत तिला डोंगराच्या पायथ्याशी, उभे रहावे लागे तर इरॉल बर्फावरून एखाद्या पक्षासारखा उडत जात असे. एक अतिशय सुंदर स्त्रीही अशीच एकदा स्काइंगसाठी आली होती. इरॉल हा सतत तिच्या आगे मागे राहिला. आणि मग त्यांची भलतीच दोस्तीही जमली (असावी.) एका ट्रीपला इरॉल आणि ती बाई ही दोघे खूप उशीरा परतली. ती बाई प्रथम परतली व नंतर काही मिनिटांनी इरॉल परत आला.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पशुपक्षी, आणि लहानसे थिएटरही इथे आहे."

"आणखी एक राहिलं की!"

इरॉल विचारात पडला.

"मी राहिले की! – तुझं सुख!"

ह्यावर उपरोधाने गंमत करीत इरॉल म्हणे, "तू स्वतःला माझं सुख समजतेस? शरीराच्या पोत्यात भरलेली वरीचशी हाडं म्हणजे सुख? तुझ्या सहवासात काही काळ काढून जर मी हिंदुस्थानात गेलो आणि तेथे एखाद्या काटेरी शय्येवर गमतीने झोपलो तरीही काटे कमी बोचतील."

आयुष्य असं मजेत चाललं होतं. हास्य-युक्त दिवस आणि प्रेमपूर्ण रात्री– आनंद-फक्त आनंद!! आणि–एक दिवस नोराच्या ध्यानात आले की ती गर्भवती झाली होती. प्रेमसंबंध चालूच होते. पण सावध-गिरी घेतलीच नव्हती. ती म्हणते, "खरं म्हणजे मी इतका मूर्खपणा करायला नको होता. मला वाटलं तसं काही होणार नाही. घडणार नाही. दोघांनाही जर मूल हवं असेल तरच गर्भ राहतो, अशी माझी आपली पोरकट समजूत होती. एकदाच मला शंका–भीति वाटली. मी इरॉलजवळ ती बोलून दाखविली. तो म्हणाला, "भिऊ नकोस, मी काळजी घेईन." नोरा घाबरली. तिने इरॉलला सांगितले. जणु काही घडलंच नाही अशा थाटात त्याने शांतपणे पेय घेतले. आणि तो तिला म्हणाला, "उपाय अगदी सोपा. गर्भपात! सॅनफ्रान्सिस्कोचा एक विख्यात डॉक्टर माझा दोस्त आहे."

"नाही! नाही!!" नोरा आकांताने ओरडली.

"याचा अर्थ मी तुझ्याशी लग्न करावे अशी तुझी इच्छा आहे तर!" इरॉल तुटकपणे म्हणाला.

"ही चेष्टेची–मौजमजेची वेळ नाही, इरॉल."

"हीच तर खरी वेळ आहे" तो मख्खपणे म्हणाला. "तुला लग्न नको आहे?"

"खऱ्या अर्थाने लग्न नको आहे. पण त्या जन्मणाऱ्या मुलाला पितृत्व देण्या-पुरतं जरी तू माझ्याशी लग्न केलंस तरी मला चालेल."

"त्यातून एका गुप्त हेतूचा मला वास येतोय्. ज्याक्षणी मी तुझ्याशी लग्न करीन त्याक्षणी तू माझ्या सर्वस्वाची स्वामिनी होशील, असंच ना?"

तिला लिलि डामिटाने कायदेशीर धडे शिकवले होते. त्याच्या कटु स्मृति त्याच्या मनात पेटून उठल्या असतील म्हणून तो असं बोलतो आहे असं वाटून नोरा त्याला म्हणाली, "मला काहीही नको. त्यावावत मी तू म्हणशील त्या कागदावर सही करायला तयार आहे."

"मला विचार करायला हवा."

नोरा घरी गेली. गर्भपाताला तिचा भावनेने विरोध होता. स्त्री म्हणून तिला मूल हवं होतं. एक दिवस तिचे वडील व ती इरॉलकडे गेली. इरॉलने अत्यंत थंडपणे तिचे स्वागत केले. तो म्हणाला, "नोरा माझे तुझ्यावर प्रेम आहे. पण मी तुझ्याशी लग्न करू शकणार नाही. कधी काळी केलेच तर ते मात्र तुझ्याशी करीन एवढेच मी तुला वचन देतो."

नोरा गंभीरपणे ऐकत होती.

"मी खूप विचार केला आहे नोरा. माझा हा वकील आहे वॉब फोर्ड. त्याच्याशीही मी बोललो आहे ह्या विषयावर! ह्यातून असा मार्ग काढता येईल." असं म्हणत त्याने वॉबकडे पाहिलं. वॉबने तिच्या वडिलांच्या हाती एक कागद दिला. कागद वाचता वाचता तिच्या डोळ्यातून आनंदाश्रु वाहू लागले.

इरॉल तिच्याशी लग्न करणार होता.

आणि मग घटस्फोट मिळविणार होता.

त्या करारानुसार तिला फक्त एकच गोष्ट मिळणार होती – मूल! आणि एक दिवसासाठी का होईना पण त्या मुलाला मिळणार होता बाप!

इरॉल फ्लिन!!

नोराने त्या कागदावर चटकन् सही केली. तिने सही केल्यावर इरॉल शांत-पणे म्हणाला, "दुसरा मुलगा होणार ही तशी आनंदाचीच गोष्ट आहे नाही का? हा माझा मुलगा आहे, असं तरी मला खात्रीने म्हणता येईल."

हे म्हणणे नोराला अमानुषपणाचे वाटले. पण त्यात इरॉलची लिली डामिटा-बद्दलची वेदनाच जणु ठुसठुसत होती.

मूल जन्माला आल्यावर त्याला बाप मिळणार होता. औट घटकेचा. आणि नोराला मिळणार होता घटस्फोट!

तिच्याच संमतीचा. तिच्याच करारा-मुळे!!

**भाग्यवती मी, भाग्यवती**

"खरंच मी भाग्यवती आहे का?" नोराने बाळंतपणासाठी वँडा मेलव्हिन (Wanda Melvin) ह्या मैत्रिणीकडे मेक्सि-कोला गेल्यावर हा प्रश्न स्वतःला वारंवार केला. कधी कधी त्या प्रश्नाचे अकरणात्मक उत्तर तिला मिळे. तर कधी त्यात पोकळी उत्पन्न होत असे. अशा वेळी अंथ-रुणावर शांतपणे पडून राहणे व काही तरी वाचणे हा तिचा उद्योग राही.


## पॅटनचं मटण

*भारत--पाक संघर्षात अमेरिकेच्या पॅटन रणगाड्याचा खेमकरणला अक्षरशः खिमा झाला, अन् मग 'त्याचा पॅटन झाला' अशी तीव्र हेटाळणी मराठीत रूढ झाली. पण वाचकहो! हा वाक्प्रचार रूढ होण्यासाठी आमच्या सैन्याला किती रक्त सांडावं लागलं आहे माहित? त्यासाठी वाचा....*

**दीपावली सेना विशेषांक मे १९६८**









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

इरॉलची पत्रे नेमाने येत. चित्रपट विषयक मासिकातून इरॉलच्या नव्या 'रोमान्स'च्या वार्ता तिच्या वाचनात येत. त्यात ज्या स्त्रीचा उल्लेख होत असे ती स्त्री नोराच्या नात्यातली असल्याचे वाचून तर ती फारच अस्वस्थ होत असे.

मग अचानक इरॉल येऊन उभा राही. प्रेमाने तिला जवळ घेई. मुलगा झाला तर त्याचे नांव 'हेल्ड' ठेवायचे व मुलगी झाली तर 'डेरडर' ठेवायचे अशा योजना ठरत. मुलाना काही म्हणता काही कमी पडू द्यायचं नाही असा निश्चय ठरे. चुंबने, आलिंगने, नव्या योजना—नवी स्वप्ने नवे संकल्प—

"आणि घटस्फोट?" नोराचे मन आकांताने तिला विचारी.

इरॉल मात्र त्याचा उल्लेखही करीत नसे.

—एक दिवस इरॉलने नोंदणी अधिकाऱ्यांना बोलावून घेतले.

नोरा ॲडिंग्टन मिसेस इरॉल फ्लिन् झाली.

दुसऱ्या दिवशी इरॉल हॉलिवुडला निघून गेला. जाताना म्हणाला, "बाळाच्या जन्मदिनी मी परत येईन. काळजी करू नकोस."

वॅंडा म्हणाली, "नोरा, काळजी करू नकोस. त्याचे खरोखरंच तुझ्यावर प्रेम आहे."

अखेर खूप यातना सहन करून, बराच काळ प्रतीक्षा केल्यानंतर नोराला मुलगी झाली. तो दिवस १० जानेवारी १९४५ हा होता. "इरॉल येईपर्यंत थांबायचे. थांबलेच पाहिजे." असा मनोमन निश्चय तिने केला होता.

मुलगी झाल्याचा आनंद एकीकडे झाला होता. एकीकडे घटस्फोटाची टांगती तलवार डोक्यावर उभी होती. इरॉल भेटायला आला तेव्हा ती त्याला म्हणाली, "आभारी आहे मी इरॉल! फार फार आभारी आहे." आणि शेवटी शांतपणे ती म्हणाली, "आता मी घटस्फोटाच्या कागदावर सही करते."

———




# आमच्या आझाद हिंदच्या

लष्करी इतिहासाचे सोनेरी पान
सप्टेंबर १९६५ मधे लिहिलं गेलं

तो नेत्रदीपक इतिहास घडविणाऱ्या
भारतीय लष्कराची जडण घडण
सादर करणारा....

**दीपावली**
साहित्य-कला-सङ्गम

**भारतीय सेना-विशेषांक**
**मे १९६८**

☆ सेना प्रमुख जनरल कुमारमंगलम्—आठ मिनिटांची एक झलक
☆ एअर व्हाइस मार्शल गोयल—उसळत्या तारुण्याची क्षमता
☆ ब्रिगेडियर ओबेरॉय—आधी केले मग सांगितले
☆ ब्रिगेडियर वढेरा—गझनीचा धुव्वा उडविणारे सॅपर्स
☆ मेजर जनरल करानी—स्टेथॉस्कोप, सिरिंज अन् स्टेन्स
☆ ब्रिगेडियर बाळ--जपानी बॉम्ब्ज् व गीता रहस्य
☆ लेफ्टनंट जनरल थोरात—नागांचा विळखा
☆ ब्रिगेडियर साठे, संचालक छात्रसेना—हर हर महादेव
☆ कॅप्टन नामजोशी—खेचरामागे डॉक्टर
☆ डॉ. भगवान गणेश कुंटे—गनिमी कावा (मराठ्यांचा)

अन् हे सारं सारं चित्तथरारक, रोमांचक साहित्य वाचता वाचता "पोटावळ्यांची हातघाई" वाचताना मुळीच हंसायचं नाही हं! माहितीपूर्ण चौकटी, संग्राह्य हकीगती, सैनिकांचे विनोद, खास व्यंगचित्रे, कितीतरी गमती नि कितीतरी जमती. शिवाय सन्मानपुष्पे, इंद्रधनुष्य, ऐसी अक्षरे इ. नेहमीची चित्ताकर्षक सदरे.

पानन् पान वाचनीय पण नुसता वाचनीय नव्हे तर जतन करून ठेवण्यासारखा अंक

पृष्ठे ७० च्या वर — किंमत दीड रुपया

एजंट व ग्राहकांनी तावडतोब मागणी नोंदवावी









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

# कालप्रवाहात न कोमेजणारी कलात्मकता

मोहेंजोदारोच्या कारागिरांनी ५००० वर्षांपूर्वी तयार केलेल्या नर्तिकेच्या आकृतीतून तिच्या चर्येवरील आनंद, तिची चिंतामुक्त मुद्रा व लयबद्धतेचा अविर्भाव व्यक्त होतात.

धातूच्या ओतकामातील पारंपारिक कलात्मकतेचे स्वरूप समाजाच्या परिवर्तनाबरोबर बदलत राहत आले आहे. मागास जमातींतील मधे कारागीर देवदेवतांच्या धातूच्या मूर्ती तयार करतात. आणि आपत्तींपासून त्या त्यांचे संरक्षण करतात असे ते मानतात. पशुपक्षांच्याही आकृत्या ते इतक्या अप्रतिम बनवितात की जणू त्या आपला जोम, आनंदी वृत्ती व शक्ती आपल्या कर्त्यांच्या प्रत्ययास आणतात.





शिल्पशास्त्रामध्ये शिल्पविशारदांना विविध देवतांची सुंदर धातुशिल्पे बनविण्यासाठी लागणारी मोजमापांची प्रमाणे दिली आहेत आणि प्रत्येक प्रकारच्या शिल्पाकृतींसाठी स्थूल व्याप्ती आखून देण्यात आली असली तरी त्या चौकटीतूनच निर्माता कलाकार अपेक्षित जिवंत वैशिष्ट्ये प्रकट करीत असतो.

धातूच्या ओतीव कलाकृतींतून अभिप्रेत भावछटा, विविध तंत्रकौशल्ये वापरून व्यक्त करणारे उत्कृष्ट कारागीर आजही आहेत.

**अखिल भारतीय हस्तकला मंडळ**

davp 67/404



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"मूर्खपणा करू नकोस."

"पण तू तर......

"घटस्फोटाच्या गप्पा मारण्याची ही वेळ नाही. मोहक कन्यका लाभली आहे. तिच्यासंबंधी बोलू या की !"

"ती नुसतीच मोहक नाही. अतीव सुंदर आहे."

"आता तू अगदी आई शोभतेस खरी."

इरॉलने त्या आनंदाप्रीत्यर्थ नोराला सोन्याच्या बांगड्या भेट म्हणून दिल्या.

पण नोराला दीर्घकाळ मैत्रिणीकडे राहणे कठिण होते. काहीतरी सोक्षमोक्ष होणे अगत्याचे होते. 'घटस्फोट' घ्यायचाच तर मग विलंब कशाला ? असे तिचे तत्वज्ञान होते.

"पुन्हा कधीतरी विचार करू." ही इरॉलची धारणा होती.

इरॉलच्या व नोराच्या गुप्त लग्नाची व त्यांच्या मुलीसंबंधीची चर्चा वृत्तपत्रा-तून दीर्घकाळ चालू राहिली.

## काही सुद्धा देत नाही !

नोराचे आणि इरॉलचे लग्न तर झाले होते. परंतु सार्वजनिक जीवनात मात्र ते एक गुपितच राहिले होते. "मग ही दोघे वेगवेगळी का राहतात ?" साऱ्यांचा एकच प्रश्न असे. तो चुकीचाही नसे. कुणी त्यासाठी नोराच्या आई वडिलांना छळत तर कुणी खुद्द नोरालाच. "फोटो प्ले' ह्या मासिकासाठी **लोला पार्सन्स** ह्या स्त्रीने तिची एक मुलाखत घेतली. त्यात नोरा म्हणाली, "मला हे सारे समजते. पण माझ्या आईवडिलांची स्थिति मोठी बिकट होते. मलाही मानाने मिरवता येत नाही. लोकांचा विश्वास बसावा अशा लग्नखुणा मला जवळही बाळगता येत नाहीत. पण तरीही मी इरॉलला दोष देत नाही. बांधून घेऊन एक सामान्य संसारी जीवन जगण्याची कल्पनाच त्याला सहन होत नाही. मला हे ठाऊक होते अगदी प्रथमपासून! दोष माझा आहे. आणि मला कळतं की कुठलीही स्त्री इरॉलला कायमची आपल्या माया-पाशात बांधून ठेवू शकणार नाही."

इरॉलने दिलेल्या एका पार्टीनंतर नोरा आपल्या घरी जायला निघाली तेव्हा इरॉल म्हणाला, "तू आणि मी लग्न होऊनही वेगवेगळे रहात आहोत. शान कायम ठेवून राहू या. सावधगिरीने राहू या. माझ्या हातून काही आगळं-वेगळं घडलं तर इथे. माझ्या घरीच घडेल. बाहेर नाही."

'आम्ही तो नियम पाळायचे ठरवले. इरॉलशिवाय दुसऱ्या कुठल्याही पुरुषाचा विचारही माझ्या मनात येणे शक्य नव्हते. एक फ्रेंच तत्वज्ञ म्हणतो त्या प्रमाणे 'एक जण प्रेम करतो आणि दुसरा फक्त करून घेतो.' हे जर खरे असेल तर माझी भूमिका ठरलेली होती – प्रेम करीत राहण्याची !"

इरॉलच्या बऱ्याच बोटी होत्या. 'झाका' ह्या बोटीवर त्याची फार प्रीति होती. एकदा तो नोराला म्हणाला, "आपण येत्या शनिवार रविवारी झाकावर जाऊ या."

आणि अचानक शुक्रवारी नोराला भेटून तो म्हणाला, "हवा फार खराब पडली आहे. सफर रद्द करू या."

नोराच्या बाबतीत हवा खराब पडली होती पण दुसऱ्या स्त्रीच्या आणि इरॉ-लच्या दृष्टीने हवा फारच मस्त पडली असली पाहिजे.

कारण पुढल्याच आठवड्यात नोराला घेऊन तो बोटीवर गेला. तेव्हा नोराने त्याला स्पष्ट शब्दात विचारले, "कुठल्या स्त्रीला घेऊन आला होतास गेल्या आठ-वड्यात ?'

इरॉलने "बस्टर वाइल्स" ह्या मित्राचे नांव तिला सांगितले. पण ते खरे नव्हते.

बोटीच्या लॉग बुकातली नोंद खोटी साक्ष देत होती. इरॉलच्या चित्राची नवी नायिका बोटीवर आली होती. राहिली होती.

नोराने त्याच्या पुढे लॉग बुक धरले आणि ती म्हणाली, "हे लॉग बुक काही वेगळेच सत्य सांगते आहे."

तो गप्प बसला.

"ही तुझी मैत्रीण ढोंगी आहे. आणि तू खोटारडा." असं म्हणत नोराने व्हिस्कीची बाटली उचलली आणि ग्लास भरला. ती थरथरत होती.

"नोरा, तुला एवढं भडकायला काय झालं?"

"माझा अधिकार नाही तसा ?"

"नाही. मी वचनभंग केला नाही."

"ह्या बोटीवर तुम्ही तिच्या अंगाला स्पर्श केला नाही ?"

"नाही ! आम्ही जवळच्या एका लहान बोटीवर होतो."

हसावं, रडावं की त्याचा खून करून मोकळं व्हावं–नोराला काही कळत नव्हतं.

"अखेर ह्या माणसाची जीवनकल्पना आपण बदलू शकत नाही हेच खरं! हृदयात प्रीति हुंकारत होती. माझे तुझ्यावर फार फार प्रेम आहे इरॉल !"

अशाच एका वीकएंडला परतताना इरॉलच्या लफड्यांविषयी नोराने विषय काढला तेव्हा तो म्हणाला, "इतर समज-तात तसा मी छिनाल स्त्रियांच्या मागे लागत नाही. त्याच माझ्या मागे लागतात. टोमॅटो आणायला मी बाजारात जात नाही. तरी ते माझ्या टेबलावर येतातच. तशाच ह्या बाया ! पण माझ्या हातून जे घडतं ते तुला फसवण्याच्या भावने-तून मात्र घडत नाही नोरा !"

"हे पटणं कठिण आहे, इरॉल."

"कशा कुणास ठाऊक त्या येतात. माझ्यावर प्रेमाचा वर्षाव करतात. मी फारसा त्यात भाग घेत नाही. वा त्यांना प्रोत्साहनही देत नाही. कधी कधी त्या स्टुडियोत माझ्या रंगपटात येतात. दार लावून घेतात आणि प्रेम करू लागतात. मी ते सारे सहन करतो. त्यात माझं असं मी काहीही त्यांना देत नाही."

"काही सुद्धा देत नाहीस ?"

"निदान हृदयात तरी त्यांना काहीही स्थान देत नाही. समजलं ?"

"असं वाटतं खरं !"

[क्रमशः]





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट







**पाडव्याच्या दिवशी गुढ्या उभारलेल्या तुम्ही नेहमीच पहाता पण साहित्यिकांच्या उभारलेल्या गुढ्यांची वर्णनं वाचून तुम्हाला हसूच लोटेल !**




—वसंत देशमुख

**संप्रदायाविरुद्ध** तात्त्विक आणि वैचारिक बंड उभारणं हेच आपलं जीवितकार्य अशी स्वतःची गैरसमजूत करून घेतलेल्या काही साहित्यशौंडानी, पारंपारिक पद्धतीनं गुढ्या उभारण्याऐवजी अभिनव तऱ्हेनं गुढ्या उभारण्याचा संकल्प, लेखण्या थरथरवित सोडला ! साहित्यिकाना एकत्र आणणं—त्यातल्या त्यात मराठी साहित्यिकाना—म्हणजे गाळणीभर सागराचा फेस घरी आणण्यासारखं दुर्घट कार्य ! तीही किमया एका पिचक्या डोळ्याच्या लेखकानी करून दाखविली. मूळात म्हणजे लेखकांच्या जागा गैरसोईच्या ! तडमडते करकरते जिने, भोकं पडलेल्या पायऱ्या, आसमंतात विखुरलेली घाण, काळोख्या खोल्या ! बेटी शारदादेवीही मोठी लबाड ! तिला असलीच घरं जास्त प्यार की काय कुणास ठाऊक ? तेव्हा बैठक कुणाच्या घरी भरवायची हाही एक कूटप्रश्नच होता ! साहित्यातली निरगाठ, सुरगाठ अन् उकल त्या मानानं फारच सोपी ! नव्या पैशाच्या शाही व प्रासादतुल्य इमले झटक्यासरशी उठविता येतात, बगिच्यातून मोर नि राजहंस फिरविता येतात, रत्नखचित सिंहासनं, सोनं, चांदी अन् जवाहीर इतकं महाग असूनही आणता येतं ! पण प्रत्यक्षात मात्र अंधेरी वास्तु, रेडिओच्या एरीयलवर बसलेला कावळा, अन् सहस्रमत्कूटविभूषित अशी डगमगित खुर्ची !

गोमन्तकात जावं अन् नाटयसंमेलनासाठी उभारलेल्या मंडपातच हीहि उपपरिषद भरवावी असा एकानं बूट काढला ! पण नवे बूट घ्यायला पुरेसे पैसे नाहीत मग इतक्या दूरवर जाण्यायेण्याचा खर्च कसा परवडणार अशी रास्त शंका दुसऱ्यानं काढली ! तो तावातावानं म्हणाला देखील—"आपल्या रहाण्या-जेवण्याची सोय गोवेकर करतील ! नाईक आहेत ! पिसुर्लेकर आहेत ! अन् सगळ्यात म्हणजे आपले भाऊसाहेब वांदोडकर आहेत ! आदरातिथ्यात गोवा कुणालाच हटायचा नाही ! पण . . . पण ? चौगुले आपले झाले म्हणून काय झालं ? बोटी कोळशावरच चालत नाहीत, पैशावर चालतात......" असे कळकळीचे उद्गार काढून आपली आर्थिक स्थिती कशी शोचनीय आहे हे इतरांवर ठसविण्यासाठी त्यांनी आपली मूळची मुद्रा आणखी भकास अन् केविलवाणी केली ! (त्याकरता त्यांना फारसे श्रमही पडले नाहीत.)

पु. ल. देशपांड्यांच्या "मुक्तांगणि" जावं अशी एक शक्कल दुसरा काढता झाला ! त्यांचं घर हे मुक्तांगण आहे अशी त्याची भाबडी समजूत ! माणूस तसा दिल्दार ! एका कवीराजाना ही कल्पना एकदम पसंत पडली. ते म्हणाले—"आमचे आहे तुम्यापाशी !" ह्या ओवीना सुरवात करून त्यांना पत्र पाठवावं ! त्यांच्यावर कुणाचा "पुल" आहे ह्यासंबंधी एकमत होऊ शकलं नाही ! ही व्यक्ति वल्ली आहे ह्यासंबंधी दुमत नव्हतं पण त्यांची गुरुकिल्ली कुठं आहे ते मात्र गवसेना !

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

चर्चा महाराष्ट्रीय स्पष्टवक्तेपणानं (म्हणजेच भांडखोरपणानं) रंगू लागली. मुक्तांगण तारांगणाइतकाच दूर असा सूर निघू लागला! एकसूर सापडेना! तेव्हा कुणाला तरी "शिवशक्ति"ची आठवण झाली.

आचार्य अत्र्यांची वास्तु अफाट! सारंच काही अफाट! लेखन अफाट, साहित्य अफाट! खर्च अफाट! हौस अफाट! रसिकता अफाट! गुणग्राहकता अफाट! लोकसंग्रह अफाट! अफाटच अफाट! त्यांना विचारताच मोठ्या आनंदानं त्यांनी संमति दिली.

आचार्य अत्रे म्हणाले:—"मित्रहो! या! या वरं! मोठ्या आनंदानं मी आपणा सर्वांचं झेंडूच्या फूलानी स्वागत करीन! या! आपण चर्चा करू! पण "पराचा कावळा" करू नका! नाहीतर "घराबाहेर" हाकलीन! विद्वत्तेपुढे मी "साष्टांग नमस्कार" घालतो–ढोंगीपणाचा बोऱ्या वाजवितो! आपण उद्याच्या संसारात गुढ्या अभिनव पद्धतीनं उभारणार आहात? छान! या! सारे, सारे या!"

साहित्यिक मंडळी बेफाम खूष! असा माणूस जगात नाही ह्यावर एकमत! त्यांच्या घरी जाण्याचा दिवस नि वेळ मुक्रर करून, सासवडच्या साहित्यिक जादूगाराचं कौतुक करीत मंडळी पांगली.

* *

शिवशक्तीत ठरल्या दिवशी एकेक साहित्यिक टिंगत, टिंगत येऊ लागला. लोकमान्य अन् सुभाषचंद्रांचे पुतळे समोर! बरं वाटलं! सुभाष हॉलमध्ये मंडळी आरामात बसली. आचार्य अत्रे हंसतच आले. मागं सोपानदेवांची मूर्ति! नमस्कार झाले! चमत्कार व्हायचे होते. सभेला सुरवात झाली.

एक लेखकू उठले. घसा खाकरला गेला. शर्टचं वरचं बटण त्यानी झटकन् सोडलं अन् ते म्हणाले, "माननीय आचार्य अत्रे!.......... आजच्या नवयुगात आपण जुने संकेत नि संप्रदाय सोडले पाहिजेत. काठीवर पितांबर व पितांबरावर चांदीचा पेला अन् पेल्याला (आपल्याच!) झेंडूची माळ घालण्यात काय स्वारस्य? अत्ता नव्या गुढ्या उभारल्या पाहिजेत! विशेषतः साहित्यिकानी! काठी बांधण्यास प्रत्यवाय नाही! पण पितांबर सोडला पाहिजे! महादजी शिंद्यानी चांदीचा पेला असा पंजानं लीलया दाबून त्याची अगदी तळलेली पापडी केली. तश्शी आपण त्या पेल्याची गत आपण केली पाहिजे! लेखकानी, कवीनी, नाटककारानी, निबंधकारानी आपापली प्रकाशित पुस्तके त्या काठीला बांधावित! पुस्तकांची माळ! वहावा! सरस्वतीच्या गळ्यातला जणु कौस्तुभमण्यांचाच हार...(कडकडून टाळ्या!) पुस्तकं फडफडवा! लेको! पितांबर नि कद काय फडफडविता? मित्र हो! आचार्य अत्रे ह्याना शिवाय हे सोईचं होणार आहे! त्यांच्या गुढीवर "झेंडूची फूलं" प्रथमच झळाळतील! संप्रदाय न मोडताही ते नवी गुढी उभारू शकतील! आपण सर्वांनी ह्या सूचनेचा विचार करावा! असं म्हणून, सोडलेलं बटण लावीत ते धापा टाकत खाली बसले!

मग एक जादा रुपकात्मक लिहिणारा लेखक उठला. बुश शर्ट सारखा करीत तो मेंदट आवाजात म्हणाला—"आचार्य अत्रे! पुस्तकांच्याच माळा.....हे सारं फार "क्रूऽर होतंय्!" आम्ही साहित्यनिर्मिति-सूचक असं काहीतरी टांगू!....."

"स्वतःलाच टांगा!" एक लांब टांगेचा लेखक मध्येच ओरडला! तेव्हा प्रज्ञा फिसफिसली! तो पुढं म्हणाला—"जीवन हे एक रुपक आहे! जीवन हे जीवन नाहीच! सारं सारं काही रुपकात्मक ("तुमचं साहित्यही!" पुन्हा तोच आवाज) अन् म्हणून ज्या लेखणीतून मी साहित्य स्रवतो त्या लेखण्या मी काठीवर बांधणार आहे! आधुनिक सरस्वतीच्या गळ्यात कौस्तुभमण्यांचा हार शोभणार नाही! लेखण्यांचा–फौंटन्पेनांचा हार खासच शोभेल.... शिवाय ते रुपकात्मक...."

"समजलं! समजलं!" "खाली बसा!" त्यांचा बुशशर्ट कुणीतरी खेचला नि रुपक एकदाचं फिट्ट बसलं!

एक ललित निबंधकार विदुषी लचकत, लचकत उठल्या. त्यांच्यावर साऱ्या नजरा




शेवटी जनता 'फूल'






अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

खिळल्या! रुपक नजरहि ! सावरलेला पदर ढाळीत त्या म्हणाल्या "संप्रदाय मोडतानाही कलात्मकतेचा आविष्कार व्हावा असं माझ्या स्त्री-मनाला वाटतं! (हाय! हाय्! ) टाकांच्या फेकीऐवजी जर चकचकीत निबांची माळ घातली तर रुपक साधूनच्या साधून औचित्यही साधेल! आमरण चकचकित असावं असं आम्हाला वाटणारच कीं नाही हो गडेऽ ऽ ऽ ऽ ऽ!" एवढंच बोलून अन् गाल फुगवून त्या घप्पकन् बसल्या!

चर्चा रंगू लागली. तिचा अंत होईना! शेवटी आचार्य अत्रे म्हणाले.– "मित्र हो! जुन्या गुढ्या उभारा! जुन्या उभारा! नव्या उभारा! नुस्ती चर्चा करू नका! तुम्ही आजकालचे लेखक बडबडता फार! लेखन कमी! लेखन म्हणजे काय चेष्टा आहे होय? मला उद्याचा अग्रलेख लिहायचा आहे! म्हणून आवरतं घेतो! लेकानो! लिहा! नव-लेखनाच्या म्हणजे चांगल्या लेखनाच्या गुढ्या उभारा! तुमची कल्पना चांगली आहे! जा! आशीर्वाद!" कॉफी घेऊन मंडळी पसार झाली. त्या गुढीपाडव्याला ज्या गु चा उभारल्या गेल्या त्या अशाः—

आचार्य अत्रेः– पारंपारिक गुढी ! (झेंडूच्या फूलांची प्रत लालभडक पाटावरं मात्र ठेवली होती! )

पु. ल. देशपांडेः–पारंपारिक! (पाटावर "तुझे आहे तुजपाशी!")

वसंत कानेटकरः–पारंपारिक! (पाटावर रायगडाला जेव्हा जाग येते! )

बाळ कोल्हटकरः–गुढीवर ज्ञानेश्वरी! (पाटावर पानाचा डबा! )

विद्याधर गोखलेः–गुढीवर "जय जय गौरीशंकर" व सुतळीनं बांघलेली सुपारीची अकरा खांडं!

वि. स. खांडेकरः– गुढीवर लाल कमळ!

ना. सी. फडकेः– गुढीवर अत्तरांच्या एकशेत्रेसष्ठ कुप्या! पाटावर 'कुलाब्याची दांडी' अन् अंजलिचा अंक!

ग. दि. माडगूळकरः– गुढीवर दोन धनुष्य बाण!

बा. भ. बोरकरः–गुढीवर स्वतःचं उपरणं!

श्री. ना. पेंडसे, जयवंत दळवी, वसंत देशमुख :–रथचक्र, चक्र आणि चक्रयुद्ध कादंबऱ्यांची रुपके म्हणून दांडीवर जुन्या घड्याळातली चक्रं लावून ठेवली आहेत.

रणजित देसाईः– गुढीवर थेऊरच्या गणपतीची छोटीशी मूर्ति!

भा. द. खेर आणि शैलजा राजेः– गुढीच्या टोकावर तेवते निरंजन!

मधु मंगेश कर्णिकः–गुढीवर शेलकाठी!

उमाकांत ठोमरेः–गुढी पाईप!

शं. ना. नवरेः–गुढीवर अमेरिकन स्वेटर!

वसंत सबनीसः–गुढीवर चिमणीचं घरटं !

बाळ सामंतः–गुढीवर खिरापतीचं चांदीचं ताट !

रमेश मंत्रीः– गुढीवर महानगर ! दांडीवर अमेरिकन टाय! टायवर "ते" बोधचिन्ह !

ज्ञानेश्वर नाडकर्णीः–गुढीवर काटे चमचे !

महादेवशास्त्री जोशीः–गुढीवर तुळशीचा हारः !

माधव मनोहरः– गुढीवर नखांची माला!

पु. भा. भावेः–गुढीवर संत्र्याची मालिका!

मनमोहन नातूः–गुढीवर गडकऱ्यांची छबी.

अनंत काणेकरः– (गुढी उभारलीच नाही! ) परदेशी गेले होते!

•••

(पान ४१ वरून—**दिवाळी अंकातील कादंबऱ्या**)

समाज, ब्राह्मोसमाज, भारतीय संस्कृति, राष्ट्रवाद या समस्यांचे धागे घेऊन 'गोरा' कादंबरीचे महावस्त्र विणले होते. पाध्ये यांची भूमिका अर्थातच वेगळी आहे. एक कोपऱ्यात टिपलेले जीवनदर्शन नेमके घडवण्याची. हे जीवनदर्शन पाध्ये यांनी कलात्मक अलिप्ततेने आविष्कृत केले आहे. पाध्ये यांच्यावर नेहमी घेण्यात येणारा भाषेबाबतचा आक्षेप येथे घेता येणार नाही. ती भाषा कादंबरीला, पात्राना अनुरूप आहे. कादंबरी वाचताना प्रत्यक्ष ते जग डोळ्यापुढे उभे राहते. हे मराठीतल्या व्यंकटेश माडगूळकरांसारख्या ज्या बोटावर मोजता येण्यासारख्या लेखकाना जमते त्यापैकी पाध्ये होत.

अजून एका कादंबरीचा येथे निर्देश करता आला असता तर या समालोचनाला तुलनेने सर्व स्पर्शित्व लाभले असते. ती कादंबरी म्हणजे श्री. मधुमंगेश कर्णिक यांची 'वीणा' दिवाळी अंकात अंशतः झळकलेली. जो भाग प्रकाशित झाला आहे तो एवढा सुरेख आहे की, वाटते ती एक झकास कादंबरी बनेल. पण क्रमशः प्रसिद्ध होण्याच्या संपादकांच्या व्यवसायनिष्ठ योजनेत ती सापडली असल्याने दिवाळी अंकाचे विरस न करण्याचे धोरण पराभूत झाले आहे.

यंदाच्या दिवाळी अंकातील ज्या दोन कादंबऱ्या मनात अधिक रेंगाळत राहतात त्यात डॉ. अनंत फाटक यांची 'नाती दोन दिसांची' आणि भाऊ पाध्ये यांची 'तोता मैना' होय. यंदाच्या दिवाळी अंकात प्रचाराची किंवा ग्रामीण जीवनाची टूम म्हणून लिहिलेल्या कादंबऱ्या वाचकास वाचण्याची पाळी आली नाही हे त्यांचे सुदैवच म्हटले पाहिजे. यंदा झळकलेल्या कादंबऱ्या रंजनाकरताच रंजन असे प्राधान्य जसे दाखवत नाहीत तद्वत् बोधाकरता बोध याचाही सोस व्यक्त करत नाहीत. या झळकलेल्या कादंबऱ्या मराठी लेखकाना काहीतरी वेगळे सांगण्याची ओढ असल्याचे दाखवतात आणि हेही काही नसे थोडके !

* * *








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# १९६७

## दिवाळी अंकातील

# कादंबऱ्या

समीक्षकः–दा. गो. देशपांडे



**दिवाळी** अंकातील कादंबऱ्यांचे मी परीक्षण करणार असे कळताच माझे एक मित्र थट्टेने म्हणाले 'एकंदर कादंबऱ्या वाचून जगला–वाचला तर भेटूच–' त्यांच्या या विधानातील विनोदाचा अंश सोडला तरी असे आढळते की, स्वतःला रसिक आणि चोखंदळ वाचक समजतो तो दिवाळी अंकातील कादंबऱ्यांच्या बाबतीत फारसा उत्साही आणि आशावादी नसतो किंवा दिसत नाही. कदाचित्, गेल्या पंधरा वर्षात वाढत्या साक्षरते आणि सुविद्यतेमुळे साहित्याच्या मराठी वाचकांच्या अभिरुचीत जे उत्क्रान्तिकरण झाले व होत आहे आणि वाचक वर्ग जो सारखा वाढत आहे त्याचा संदर्भ मनात सतत न वागवल्याने असे होत असावे. आजच्या मराठी मासिकांची संख्या, फिरती वाचनालये आणि दैनिकांच्या रविवारच्या किंवा साप्ताहिकांच्या अंकाकडे पाहिल्यास आज सर्व साधारण वाचकवर्ग केवळ विस्तारल्याचे दिसते असे नव्हे तर तो फार मोठ्या प्रमाणावर ललित साहित्याचा भूकेला आणि चाहता आहे हे ध्यानात यावयास उशीर लागणार नाही. या वाचकवर्गाच्या ओघानेच काही मागण्या आणि अपेक्षा असणे साहजिक आहे आणि याचा परिणाम प्रसिद्ध होणाऱ्या साहित्यावर होणे अटळ आहे. मराठी कादंबरी याला अपवाद नाही. ती अपवाद नाही म्हणून त्यात काही गैर आहे असेही नव्हे.

यंदाच्या दिवाळी अंकातील कादंबऱ्या वाचून, म्हणूनच, मला तसा काही विपरीत अनुभव आला नाही. उलट जुन्या, नव्या, आणि होतकरू लेखकांनी यंदा जे कादंबरी या नावाखाली लिहिले आहे ते सर्वच वाचनीय होते असे म्हटल्यास ते वस्तुस्थितीला सोडून होऊ किंवा अतिशयोक्तीचे ठरू नये. 'मागणी तसा पुरवठा' हे वैश्य व्यवसायाचे सूत्र आणि तत्त्व असले तरी ते साहित्याचे सूत्र व तत्त्व ठरू शकत नाही. अर्थात् लेखन हे जेव्हा उपजीविकेचे साधन बनते तेव्हा मागणी तसा पुरवठा ही उत्तेजक शक्ति बनते. ही शक्ति जोपर्यंत प्रेरकशक्ति बनत नाही तोपर्यंत काही फारसे बिघडत नाही. फक्त 'मागणी तसा पुरवठा' याला केवळ मागणी म्हणून 'वाटेल तसा पुरवठा' असे विकृत स्वरुप प्राप्त झाले नाही म्हणजे तसा धोका संभवत नाही. प्रत्येक लेखक हा काही ज्ञानेश्वर, टागोर, हरिभाऊ किंवा कवि बेन्द्रे नसतो. तो तसा नसतो म्हणून त्याचे साहित्य टाकाऊ नसते. किंबहुना अनेक लेखकांच्या सृजनक्षमतेमुळे साहित्याचा प्रवाह अखंडपणे चालू राहतो आणि त्यामुळेच साहित्यातील मौलिकतेची आणि चिरकालत्वाची पार्श्वभूमी तयार होत असते. सर्व सामान्यपणे बरे लिहिणारा लेखक म्हणूनच एकादी अव्वल दर्जाची कृति निर्माण करून जातो. आजचे म्हणून जे साहित्य आहे त्यातूनच उद्याचे साहित्य सिद्ध व संपन्न होत जाते.

या भूमिकेतून, यंदा ज्या कादंबऱ्या माझ्या वाचण्यात आल्या आणि ज्या मी वाचू शकलो त्यांचा मनावर जो विशेष ठसा उमटला आणि मराठी कादंबरीच्या दृष्टीने त्यांची जी वेधक लक्षणे वाटली ती पाहणेच उद्बोधक व समुचित ठरेल. कारण ज्या कादंबऱ्या वाचण्यात आल्या त्या सर्वांचेच परीक्षण करणे गृहित, अभिप्रेत आणि अपेक्षित नाही. शिवाय ते अस्थानी व कालापव्ययाचेच ठरण्याचा संभव अधिक. हेहि स्पष्ट केले पाहिजे की, ज्या कादंबऱ्यांचा प्रस्तुतच्या समालोचनात निर्देश केला जाणार आहे त्यामागे इतर कादंबऱ्याना अनुल्लेखाने मारण्याचा मुळीच हेतु नाही. सुरवातीला सांगितल्याप्रमाणे सर्वच कादंबऱ्या वाचनीय आहेत.

यंदाच्या दिवाळी अंकात दरवर्षी आपल्या कादंबरीने वाचकांच्या भेटीस येणारे प्रा. ना. सी. फडके आणि श्री. पु. भा. भावे हे अभावाने तळपले. तसेच श्री. बोकील आणि श्री. चन्द्रकान्त काकोडकर यानी हजेरी लावल्याने अधिक फरक पडलेला नाही. सर्वच जुन्या लोकप्रिय कादंबरीकारांप्रमाणे या दोन्ही लेखकानी आपला असा वाचकवर्ग निर्माण केलेला आहे. त्यातही श्री. काकोडकरांच्या कादंबऱ्यांचा वाचकवर्ग शहरातील नोकरी करणाऱ्या तरुण तरुणीचा प्रामुख्याने असल्याने त्यातील कला आणि भावना याच्या चित्रणाच्या आणि आविष्काराच्या मर्यादा उघडपणे जाणवतात आणि खटकतातही.








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



वीररस—

**परसामाजी ऐकुनि खुडबुड, दचकुनि दोघे उठून बसली।**
**कानोसा मग हळूच घेउनि, कुजबुज चाले भेदरलेली ॥१॥**
**बघून या की म्हणता त्याला, अधिकच दिसला तो घाबरला।**
**सोबत चल की म्हणे बघूया, तयार ना परि पुढे व्हायला ॥२॥**
**पुसोनि मुखिचे घर्म–बिन्दु हे, धीटपणाने वदे शब्द की।**
**नव्हते ठाउक असशिल इतुकी, भित्रि न की ये सोबत सुद्धा ॥३॥**

**—पंडित महाजन**

विषय, शैली आणि मांडणीच्या अनुषंगाने ज्या सात कादंबऱ्यांचा उल्लेख केला पाहिजे त्या अशा:—

| | | | |
|---|---|---|---|
| १. 'अद्वैत–' | ले. | सौ. शकुन्तला गोगटे—अंक | 'माहेर' |
| २. 'नाती दोन दिसांची | " | डॉ. अनंत फाटक. | " 'सह्याद्रि' |
| ३. 'स्पर्शाची सावली | " | श्री. माधव कानिटकर | " 'प्रपंच' |
| ४. 'तोता मैना' | " | श्री. भाऊ पाध्ये | " 'आन्दोलन' |
| ५. 'शरीर' | " | श्री. प्रभाकर अत्रे | " 'आविष्कार' |
| ६. 'सावली' | " | सौ. निर्मला कुलकर्णी | " 'रोहिणी' |
| ७. 'प्रतिमा? प्रतिबिंब?' | " | श्री. ज. ग. देवकुळे | " 'आविष्कार' |

—यापैकी सौ. शकुन्तला गोगटे यांची 'अद्वैत' आणि श्री. माधव कानिटकर यांची स्पर्शाची सावली या दोन्ही कादंबऱ्या फडक्यांच्या शैलीचा प्रभाव दाखवतात. गोगटे यांच्या कादंबरीत वाचकाना ओढून नेण्याची खुबी आहे. वरवर या कादंबरीत प्रेमाचा त्रिकोण असला तरी या प्रेमाचे पदर निराळे आहेत. दोन जुळे भाऊ आणि एक तरुणी यांच्या प्रेमाची ही कथा, शारिरीक आकर्षण व आसक्तीच्या कडेकडेने जात जात त्याच्या अतीत सहज जाते हा कलेच्या यशाचा एक टप्पा म्हणता येईल. एक टप्पा म्हणावयाचे कारण असे की, या कादंबरीची गुंफण बारीक व नाजुक मानवी मनाच्या क्रियाप्रतिक्रियातून झालेली असली तरी कादंबरीचा आधार घात आणि अपघात ही आहेत. जुळे भाऊ हा पहिला दैवी योग. पैकी ज्या तरुणीवर दुसऱ्या जुळयाचे प्रेम तिचे ज्याच्याशी लग्न होते तो जुळा एक, वास्तु अंगावर कोसळून कायमचा अपंग होणे हा दुसरा अपघात आणि ती वास्तु कोसळताना त्या नवविवाहित तरुणीचे एकुलते एक अपत्य मरण हा तिसरा अपघात. कादंबरी वाचून झाल्यावर मनात पहिला प्रश्न येतो तो असा की, हे अपघात झाले नसते तर या प्रेमाच्या त्रिकोणाचे काय झाले असते? याला लेखिकेडून उत्तर येण्याचा संभव असा की, ही एक सत्यकथा आहे त्याला काय करणार? परन्तु कलेच्या क्षेत्रात अशा उत्तराला फारसा अर्थ नसतो. कारण सत्यसृष्टीत ज्या समस्या असतात त्यांच्या भोवती प्रतिभेचा फेर सुरू झाला म्हणजे समस्येचे तरलत्व प्रस्फुटित व्हायचे असते. यातच प्रतिभावंताचे बलस्थान असते. सौ. गोगटे यांच्या अद्वैत कादंबरीत त्यांची प्रतिभा दिसते पण प्रतिभेचे बल मात्र प्रत्ययास येत नाही. परन्तु ही लेखिका अपेक्षा निर्माण करते हे मात्र निश्चित.

—सौ. गोगटे यांच्या मानाने श्री. कानिटकरांची 'स्पर्शाची सावली' ही सफाईदार वाटते. शेक्सपिअरच्या ऑथेल्लो नाटकापासून संशय हा प्रेमाला कसा काळवंडून टाकतो याचे दर्शन लेखकानी करून दिले आहे. श्री. कानिटकरांनी आपल्या कादंबरीला हाच विषय निवडला आहे. आणि तो आजच्या उद्योगप्रधान शहरी हालचालीच्या फेऱ्यात वसवला आहे. साध्या आणि दररोजच्या प्रसंगाचा मागोवा घेणाऱ्या आयुष्यक्रमात माणसे एकमेकापासून दूर जातात आणि येतात. आपल्या स्त्रीपुरुष संबंधाला अनेक स्तर लाभलेले असले तरी आतून भारतीय नवऱ्याचे मन स्वतःच्या स्त्रीच्या बाबतीत कसे हळवे व संवेदनक्षम असते याचे वेचक चित्रण कानिटकरांनी केले आहे. फक्त त्यांनी आपल्या कादंबरीचा शेवट जो Melo-dramatic केला आहे तो मात्र रंजकत्वाला बळी गेल्याचा प्रकार भासतो. परन्तु, कदाचित्, कानिटकरांनी रंजन करणाऱ्याचीच (Entertainer) भूमिका स्वीकारल्याने अधिक गहिरेपणा आणि सूचकता ही टाळली असावी. सफाई हा श्री. कानिटकरांच्या सर्वच कादंबऱ्यांचा गुण आहे. पण चाळीस कादंबऱ्यांपर्यंत मजल मारल्यानंतर साचेबंदपणा टाळण्याचे धाडस त्यांनी करावयास हरकत नाही.

सौ. गोगटे आणि श्री. कानिटकरांच्या कादंबऱ्या पांढरपेशा मध्यम वर्गीय संसारातच घुटमळत असल्याचे दिसते. पांढरपेशांचेच परन्तु सर्वस्वी वेगळे असे चित्र डॉ. अनंत फाटक यांच्या कादंबरीत आकारले आहे. ते नुसते आकारले असे नव्हे तर समर्थपणे साकारले आहे. भारतीय जीवनाची नीति-मूल्ये, सौंदर्यवाद आणि राष्ट्रवाद यात वाढलेल्या व परदेशात शिकावयास गेलेल्या तरुणाची आणि त्याच्या तेथील निवासात उचंबळलेल्या भावनांची व वादळांची ही कथा **'नाती दोन दिसांची'** या कादंबरीत रंगवली आहे. पाश्चात्य जीवनातील स्त्री–पुरुष संबंधाना त्यांच्या वांशिक उच्चतेचे आणि उद्योगप्रधानतेचे अवगुंठन असते. त्याने प्रेमात पडलेल्या भारतीय मनाला कसे हादरे बसतात याचे सूक्ष्म व हृदयस्पर्शी चित्रण डॉ. फाटकांनी केले आहे. डॉ. फाटकांनी ते ज्या कौशल्याने केले आहे, त्याचे कारण त्यांची अतिशय अर्थवाही भाषा. पाश्चात्य जीवनावर आपल्याकडे श्री. रमेश मंत्री यांच्या 'महानगर' या अप्रतिम कादंबरीनंतर डॉ. फाटकांच्या कादंबरीकडे अंगुलीनिर्देश करता येईल, इतकी ती सरस वठली आहे. या कादंबरीचा आणखीन् एक विशेष असा की, ती स्वातंत्र्यपूर्व परदेशस्थ भारतीयांच्या जगण्याला अन्वर्थक स्पर्श करून जाते. दोन भिन्न परंपरेची आणि संस्कृतीची माणसे जेव्हा जवळ येतात तेव्हा ती नाती कशी दोन दिसांची ठरतात व असतात हा रोख व भाष्य टाळून सूचित केल्याने परिणामकारक ठरला आहे.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

या समालोचनात मध्यम वर्गीय जीवनाभोवती पिंगा घालणारी तरीहि वेगळी वाटणारी एक लघुकादंबरी श्री. प्रभाकर अत्रे यांची **शरीर** होय. फिरत्या जीवनाचा व्यवसाय असलेल्या माणसाला आपल्या शारीरिक भूका भागवण्याची अनिवार इच्छा होणे स्वाभाविक आहे. अशा जीवनात असे होणे हा एक अपरिहार्य भाग आहे असे मानण्याकडेच अधिक कल असतो. परन्तु मानवाची प्रत्येक शारिरीक क्रिया ही विनचूकपणे मानसिक प्रतिक्रियेशी निगडीत असते. या शरीर–मनाच्या प्रक्रियेतून माणसाचे व्यक्तिमत्व अंतर्गतरित्या घडत, विघडत आणि पोखरले जात असते. न सांगता हे वाहेरून तीव्रतेने कळण्यासारखे नसते. 'माणसं तीच असतात. शरीरं तीच असतात. वर्षानुवर्षे ती एकत्र येत असतात. शरीर भोगतच असतात. आणि शरीरं जून झाली तरीही मनाचे नवे नवे कोंभ फुटतच असतात. त्यातून प्रेमाचा, श्रद्धेचा, समर्पणाचा रस गळतच असतो.' असे जे अत्र्यांनी या कादंबरीच्या नायकाच्या स्वगतात अंतर्भूत केले आहे तोच या कादंबरीचा विषय आहे. प्रेम पार्थीव-अपार्थिवाच्या भोवऱ्यात सापडून कसे हिंदकळत असते हे दाखवण्याचा हा प्रयत्न तसा सोपा नव्हे. अत्र्यांनी तो हाताळला पण चांगला परन्तु त्यांनी जी निवेदनाची पद्धति लेखनाळली आहे ती काही ठिकाणी रुक्ष तर काही ठिकाणी भाष्यवजा वाटते. एके ठिकाणी त्यांचा नायक म्हणतो 'उरतात फक्त शरीरे. साधतो फक्त उपभोग–दायित्वशून्य उपभोग. घ्यायचा आणि द्यायचा आणि पाटी पुसून टाकायची'– या चार वाक्यांच्या ऐवजी 'उरतात फक्त शरीरं' एवढे एकच वाक्य बस् झाले असते. भाष्याचा मोह टाळला असता तर अत्रे यांच्या या लघुकादंबरीस अधिक परिणामकारक परिमाण लाभले असते. तरीही पाहता पाहता अश्लीलतेकडे कलणाऱ्या प्रसंगाना वेगळीच मनोव्यापाराच्या स्पंदनाची धार देऊन त्यांनी ही जी कादंबरी खुलवली आहे त्याकरता ते अभिनंदनास पात्र आहेत.

या कादंबऱ्यात एक रहस्याची कथा श्री. ज. ग. देवकुळे यांनी '**प्रतिमा? प्रतिबिंब?**' यात गोवली आहे. देवकुळेयांनी अर्धा भाग अतिशय कलाकुसरीने नटवला खरा पण पुढे दोन जुळे या आधारावर एकच व्यक्ति कारस्थानास कारण आहे हे उघड होते आणि मग वाचण्याचे स्वारस्य कमी होत जाते. अर्थात्, मराठीत अस्सल चांगले रहस्यमय वाचावयास मिळत नसल्याने या रहस्याचे रंजकत्व उरते हे काही सांगावयास नको.

वेगळ्या वातावरणाची आणि शहारापासून काहीशा दूरच्या दुनियेची कादंबरी सौ. निर्मला कुळकर्णी यांची '**सावली**' होय. कोकणातील जमीनदार घराण्याची एक जबरदस्त व्यक्तिरेखा निवडून सौ. कुळकर्णी यांनी आपली कादंबरी बांधली आहे. समृद्धी, सौंदर्य आणि सामर्थ्य लाभलेली ही विवाहित व्यक्ति पारंपारिक वातावरणात, खालच्या जातीच्या तरुण मुलीशी आलेल्या व ठेवलेल्या संबंधाने आरपार हिसळून जाते व उन्मळून पडते. हाच वास्तविक पाहता एका करुणार्द्र, कादंबरीचा घन विषय होऊ शकतो व सौ. कुळकर्णी यांनी याच आधाराने कादंबरीचा पसारा वाढवला आहे. ज्या तरुणीशी संबंध आला तिच्यावर अन्याय्य आणि अमानूष प्रहार झाल्याने ती मरते पण मरताना जमीनदाराच्या सर्व कुटुम्बालाच तळतळाटाचा शाप देऊन जाते आणि त्या शापाच्या सावलीत सर्व खानदान उध्वस्त होत जाते. खेडोपाडी जिथे जिथे जमीनदारी–सावकारी होती तिथे तिथे अशा कथा ऐकावयास मिळतात. त्यात तसे नवे काही नाही. परन्तु सौ. कुळकर्णीनी हे चित्रण करताना मानवी स्वभावाची अहंभावी गुंतागुंत व तिचे पापुद्रे हळुवारपणे खुलवल्याने कादंबरी चटका लावते. म्हणूनच वाचताना अपेक्षा उंचावत जातात न जातात तोच कादंबरीचा व्याप तीन पिढयातील प्रसंगांच्या व घटनांच्या गर्दीत फसतो, रूततो आणि परिणामाची पकड सैल होत जाते. केवळ कादंबरी पूर्ण करण्याकरता तीन पिढयातील घटित–अघटित वावत आहे असे अस्वाभाविक व अतार्किक चक्र गरगरते. कर्तृत्व, पुरुषार्थ आणि यश हे नेहमीच सुदैव व दुर्दैव यात हिंदकळत असते. या त्रिकालबाधित दैवगतीला अनुसरत या कादंबरीतला 'शाप' वावरला असता तर ही एक 'शापकथा' बनावयाच्या ऐवजी समर्थ कादंबरी झाली असती. पण झाले आहे उलटे. त्यामुळे कादंबरीचा सलग असा गहिरा ठसा उमटत नाही. तरी पण एका वेगळ्या जगाची निवड करून कादंबरी-लेखनाचे जे धाडस सौ. कुळकर्णी यांनी केले आहे तीच त्यांच्या भावी यशाची नांदी ठरावयास हरकत नाही.

या सगळ्या कादंबऱ्यांपेक्षा सर्वस्वी वेगळ्या घर्तीची आणि निराळ्या जीवनाची कादंबरी आहे आजच्या वादग्रस्त भाऊ पाध्यांची '**तोता मैना**' होय. 'तोता मैना' ही तशी प्रेमकथाच आहे. पण ती आहे भारतातीलच वेगळ्या धर्मियांची. अगदी छोटी जमात पण आपलं "घरकुल" येन केन प्रकारेण अबाधित ठेवण्याकरता जपणारी. त्यातही आजच्या जीवनात वरचा स्तर व खालचा स्तर यातील सीमारेषा आर्थिक व सामाजिक लोंढ्यामुळे पुसटल्या कशा जातात याचा अप्रत्यक्ष कानोसा घेणारी. पाध्यांनी या कादंबरीची सुरवातच पूर्णपणे भारतीय कबड्डी सामन्यांच्या रांगड्या प्रसंगाने साधली आहे. ही सुरवातच इतकी दिलखेचक आहे की, वाचावयास घेतलेली ही कादंबरी संपेपर्यंत खाली ठेववत नाही. अतिशय गतिमान प्रसंग, आणि ज्याला अंडरवर्ल्ड म्हणतात ते वातावरण अचूकपणे टिपत पाध्यांनी एक अनाथ मुलाची प्रेमकहाणी ग्रथित केली आहे. हा अनाथ मुलगा मूळचा हिन्दु असतो. अन्यधर्मिय त्याला पुत्रनिर्विशेष मायेने वाढवतात. वाढवणाऱ्याखेरीज इतराना हे माहित नसते. हा मुलगा त्याच वातावरणात तारुण्यात त्याच जातीच्या मुलीच्या प्रेमात पडतो आणि प्रेम सफल होण्याच्या मोक्यावर गौप्य बाहेर येते व सारे विस्कटते आणि तो मुलगा पुन्हा अनाथ होतो. असाच विषय फार वर्षापूर्वी रवीन्द्रनाथ टागोरांनी आपल्या 'गोरा' कादंबरीत उत्कर्षास नेला होता. पण टागोरांनी बुरसटलेला हिन्दु

[ पृष्ठ ३८ वर पहा ]





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# १९६७

## दिवाळी अंकातील कथा

—प्रा. यशवंत दिनकर फडके

**सालाबादप्रमाणे** यंदाही शे-दीडशे दिवाळी अंक आणि त्यात शेकड्यानी मोजाव्या लागतील इतक्या कथा प्रसिद्ध झाल्या आहेत. पुस्तकांच्या बाजारात कथासंग्रहांचा फारसा खप होत नसल्यामुळे कथाना एरवी फारसा भाव नसतो पण दिवाळी अंकांचे संपादक मात्र जाहिरातींच्या खालोखाल कथाना महत्व देत असल्यामुळे कथांचा व कथालेखकांचा भाव दिवाळीच्या सुमारास नेहमी वाढतो. एरवी मासिक विकत घेऊन वाचण्याच्या फंदात न पडणारा सर्वसामान्य माणूस दिवाळीच्या वेळी चक्क अंक खरेदी करून वाचतो. दोन घटका वाचून करमणूक व्हावी एवढीच त्याची त्यावेळी साहित्यविषयीची माफक अपेक्षा असते. त्यामुळेच दिवाळी अंकातल्या कथा मुख्यत: रंजक स्वरुपाच्या असणे आवश्यक होत असावे. नवशिक्या लेखकांपेक्षा नामवंतांची हजेरी आपल्या अंकात लावण्यासाठी धडपडणे हे संपादकानाही धंद्याच्या दृष्टीने आवश्यक होते. मग एके काळी सुरेख कथा लिहून नांवलौकिक कमावलेले व एरवी वर्षभर मौन राखणारे मातबर लेखक कथांचा घाणा घालतात. त्यांच्या कथात तीच तीच माणसे नावगाव बदलून पुन्हा पुन्हा येतात आणि त्यांच्या कथा आवडीने वाचणाऱ्या चाहत्याना ओळखीची माणसे भेटल्यासारखी वाटतात. काही वेळा या मुखवट्यामागचा लेखक इतका स्पष्ट दिसतो की त्याच्या कथेतील व्यक्ती कळसूत्री बाहुल्यासारख्या निर्जीव वाटू लागतात; अनुभव बनावट वाटू लागतो. या परिस्थितीला शरण न जाणारी व जिद्दीने काही नवे वेगळे देऊ पाहणारी मासिके आणि लेखक असतात; नाही असे नाही. मात्र त्यांची संख्या हाताच्या बोटावर मोजता येण्याजोगी असते. पण कथा हा वाङमय–प्रकार संपन्न होतो तो अखेर अशा लेखकांच्या कृतीमुळेच !

हे सारे दरवर्षी घडते; तसे ते यंदाही घडले आहे. गोष्ट, हरिभाऊंची स्फुट गोष्ट, गुर्जरांची संपूर्ण गोष्ट, फडके-खांडेकरांची लघुकथा आणि गाडगीळांची नवकथा अशी वळणे घेत घेत मराठी कथेने गेली दीडशे वर्षे वाटचाल केली. यंदाच्या दिवाळी अंकातल्या कथा वाचकाला या सर्व वळणांची आपापल्या परीने आठवण करून देतात. तीस-पस्तीस वर्षांपूर्वी कथेचा प्रांत गाजवणारे खांडेकर, बोकील व त्यांच्याच वळणाची कथा लिहिणारे ठोकळ किंवा लक्ष्मणराव सरदेसाई यांचे कथालेखन आज मंदावले असले तरी ते थांबलेले नाही. लक्ष्मणराव सरदेसाईंच्या कथांमधल्या कलावंतिणी किंवा त्यांचे दलाल परिस्थितीने कुमार्गाला लागलेले असले तरी त्याना नीतिमूल्यांची कदर इतरांपेक्षा जास्त असते. वेश्या किंवा त्यांचे दलाल यांचे असले चित्रण मराठी साहित्यात तीस वर्षांपूर्वी फार लोकप्रिय होते. खांडेकर, ठोकळ किंवा सरदेसाई या जुन्या पिढीच्या कथाकारांचे लेखन कथानकाच्या जाचातून अजून सुटलेले दिसत नाही. घटनांची उतरण रचण्यासाठी किंवा जुळवाजुळव करण्यासाठी अजून त्यांची कसरत चाललेली दिसते. भावविवशता व भावपूर्णता यातील नेमके अंतर त्याना अजून ओळखता आलेले दिसत नाही.

मराठी कथेने १९४५ ते १९५० च्या दरम्यान नवे रूप धारण केले असे मानले जाते. त्याचे श्रेय मुख्यत: गंगाधर गाडगीळ, गोखले, माडगूळकर, मोकाशी व भावे याना दिले जाते. या नवकथेची चाहूल ज्यांच्या कथालेखनात लागत होती त्यापैकी वामन चोरघडे हे एक. आशयामुळे एखाद्या क्षणचित्रासारखी वाटणारी कथा काव्यात्म वृत्ती, लयबद्ध व नादमधुर भाषा व वैशिष्ट्यामुळे चोरघड्यांच्या कथा एकेकाळी लक्षात राहात असत. आज मात्र चोरघड्यांच्या कथेतला अनुभव तपशीलामुळे, अघळपघळ निवेदनामुळे व अनावश्यक स्पष्टीकरणामुळे कसा फिकट होत जातो हे त्यांच्या 'राजहंस'मधील 'लागी नाही छुटे राम' या कथेत दिसते. एका भावस्थितीचे चित्रण करणारी 'चर्चा' या दिवाळी अंकातील 'पूर्णाहुती' ही कथा त्यांच्या चिंतनपर लिहिण्याच्या हव्यासाने पार बिघडून गेली आहे. त्यामानाने 'बागेश्री'मधली त्यांची 'उत्तमांत' ही कथा त्यांच्या इतर कथांमध्ये उजवी वाटते.

गंगाधर गाडगीळांनी थोडे लिहिले आहे पण जे लिहिले आहे त्यामुळे त्यांची साहित्यक्षेत्रातली पत सांभाळली गेलेली नाही. राजन् नांवाच्या कॉलेज युवकावर त्यानी लिहिलेली 'किर्लोस्कर' मधली 'कंटाळा' ही कथा वाचताना इतका कंटाळा येतो की शेवटपर्यंत वाचणे अवघड होते. मधुकर त्र्यंबक देव नावाच्या त्या मानाने अप्रसिद्ध लेखकाने वशा नांवाच्या अशाच एका युवकावर 'चर्चा' या दिवाळी अंकात जी कथा लिहिली आहे ती कमालीची वेधक व अस्सल वाटते. व्यंकटेश माडगूळकरांच्या कथाही आता सत्वहीन वाटतात 'डोहातील सावल्या' या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

'सुगंध'मधील कथेचे मर्म ते असे सरळ उकलून सांगतात "माणसाच्या मनात शांत, स्थिर, खास त्याचे असे एक जग असते. स्वत: पलीकडे कुणाला माहित नसलेले हे जग म्हणजे "कमळीची आठवण". श्री ज जोशी यांची 'स्वप्नगरी' ही 'प्रपंच'मधील कथा अशाच कल्पनेवर आधारलेली आहे व तेही ती अशीच स्पष्ट करून सांगतात

गाडगीळ माडगूळकरांच्या मानाने भावे, गोखले व मोकाशी यानी विपुल लिहिले आहे. विमुक्त वृत्तीने लिहीलेल्या जोषपूर्ण कथांनी भाव्यांनी एकेकाळी लक्ष वेधून घेतले होते. त्यांच्या प्रसन्न व ऐटबाज शब्दकळेने वाचकाला भूल घातली होती. आजही भाषेच्या दिमाखाने भावे दिपवू पाहतात. त्यांच्या कथा वाचताना वाटत राहते, भाव्यांना ही कल्पना छान सुचली आहे आणि त्यासाठी हवी तशी रचना करण्याचा भावे खटाटोप करीत आहेत. भाव्यांमधला प्रचारक व तत्वचिंतक इतक्या वेळा व अकारण डोकावतो की अखेर भाव्यांच्या कथेत फक्त त्यांनी अनुभवाच्या कलेवरावर मुक्तहस्ताने उधळलेले शब्द शिल्लक राहतात–भाव्यांच्या ऐश्वर्याची साक्ष देत ! 'लोकसत्ते'-तील 'सीता'या कथेत सीतेचा मृत पती तिला भूत होऊन भेटत असल्यामुळे काय होते ही भाव्यांची मूळ कल्पना चांगली आहे पण या कथेतही असेच होते भाव्यांच्या या कथेवरून आठवले भाव्यांच्या प्रमाणे यंदा ग दि. माडगूळकर, दि. बा. मोकाशी व जी. ए. कुलकर्णी यांनाही अशीच 'भूतबाधा' झालेली दिसते. ग. दि. माडगूळकरांची 'टेलिफोन' ही 'सुगंध'मधली कथा, मोकाशींची 'हंस'मधली 'वेताळ' व जी. ए. कुलकर्णींची 'अंजन' ही 'सुगंध'मधली कथा या साऱ्यांचाच भूत–पिशाच्चाशी संबंध आहे. अर्थात प्रत्येकाने पाहिलेले भूत किंवा भूते निराळी आहेत.

गोखल्यांनी भूत-पिशाच्चावर लिहिलेले नसले तरी त्यांच्या कथांतल्या घटना किंवा व्यक्ति नेहमीप्रमाणे लोकविलक्षण आहेत. जीवनातल्या चमत्कृतीचा गोखल्याना एवढा सोस आहे की त्यांची कथा त्याशिवाय आकार घेऊ शकत नाही. तशात लोकविलक्षण जीवन जगणाऱ्या त्यांच्या नायक नायिकांच्या मनावर गोखल्यांच्याच शब्दात सांगायचे तर संस्कारांचे सावट येते व मग त्यांची स्त्री कुतरओढ होते तिचे गोखले विलक्षण गंभीरपणे चित्रण करतात. गोखल्यांच्या 'दीपावली'तील 'अभिसारिकेला' आपल्या प्रेमाला पापाचे अस्तर लागले अशी रुखरुख लागते. 'प्रपंच-' मधल्या 'कन्यादान' करणाऱ्या तिलोत्तमेच्या मनावर संस्कारांचे सावट आल्यामुळे तिची तगमग होते.

आद्य नवकथाकारांपैकी फक्त मोकाशींच्या कथा मात्र आजही ताज्या, टवटवीत वाटतात. विविध अनुभव वेगवेगळ्या तऱ्हानी व्यक्त करण्याची मोकाशींची धमक कायम आहे. 'बागेश्री'मधली त्यांची 'मयसभा' ही यंदाची एक उत्कृष्ट कथा आहे. जुन्या कथेशी नाते राखीत व नव्याशी घसट करीत मोकाशींनी आपली अशी एक वाट शोधलेली आहे म्हणूनच त्यांची कथा जुन्या कथेसारखी दिसली तरी ती नवी असते.

या घटकेला कथाक्षेत्रात आघाडीला असणाऱ्या जी. ए. कुलकर्ण्यांच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. गाडगीळांच्या नंतर जी. ए. कुलकर्णींच्या मुळे मराठी कथेने केवढी मोठी झेप घेतली आहे हे पाहायचे झाल्यास जी. एं. ची 'साधने'तील 'ठिपका' ही कथा वाचावी. या कथेचा अर्थ सरळ, सहज लक्षात येतो असे नाही पण अंतिम सत्याचे दर्शन एखाद्याला झाले तरी ते त्याला दुसऱ्याला सांगता येत नाही, ही माणसाची केविलवाणी अवस्था सुचवण्याचा जी. एं. चा इरादा असावा. पांढऱ्या ठिपक्याचा वेध घेत जाणाऱ्या मेंढपाळ रामण्णाला वाटेवर भेटलेली माणसे म्हणजे सोन्याच्या सापाचा शोध घेणारा गारुडी, संन्याशी, आंधळा भुत्या, लाकडाच्या अड्ड्यातला आजारी पोरगा ही अंतिम सत्य पाहू इच्छिणाऱ्या विविध प्रवृत्तींची प्रतीके असली व त्या त्या प्रतीकाचा अर्थ नीटसा स्पष्ट होत नसला तरी व्यक्ति म्हणूनही ती एवढी रसरशीत वाटतात ! मात्र जी. ए.नाही बऱ्याच वेळा कथेचा आशय वाचकाला सरळ सरळ सांगून टाकल्याशिवाय राहवत नाही. त्यांच्यातला 'मास्तर' असा नको त्या ठिकाणी जागा होतो व मग जी. एं.च्या 'अंजन' मधला मल्हारी भैरूला सांगतो, "एखादं नाटक असतं की नाही तस्सा आहे बघ सगळा मामला. त्यात माणस भांडतात." वगैरे वगैरे. 'हंस' मधल्या 'दूत' या दृष्ट लागण्याजोग्या कथेला गालबोट लावल्याशिवाय जी. ए. ना राहवत नाही. ते सांगतात, "लाडली काय, जळवेलानं वेटाळलेला आंबा काय, आपण, दादा, ताई काय – अविरतपणे फिरत असलेल्या विशाल अदृश्य चक्राला चिकटलेली एवढीशी, लहान मुलांच्या टाळूसारखी स्पंदनं आहोत झालं" वगैरे वगैरे. असले काही दोष खटकले तरी प्रकाशाचा एखादा कवडसा पडावा आणि अंधाऱ्या खोलीचा एखादा तुकडा लख्ख दिसावा तसे जी. एं.च्या कथेने मानवी जीवनाचे एखादे अंग उजळून निघते.

खरे म्हणजे जी. ए. किंवा त्यांच्या आगेमागे लिहिणारा नवा मराठी कथालेखक असा एखादा थरथरता जिवंत क्षण पकडू पाहतो आहे. त्याने लिहायला घेतलेली कथा म्हणजे जीवनांगाचे


**Accommodation Available**

**At Poona, Near Peshve Park, Newly constructed Two self-contained blocks of 1000 and 800 square feet each with Two Bed rooms, Hall, Kitchen with 2 bath-rooms and toiletrooms (one English type). Suitable for residential or branch office. Company Lease or Ownership Basis considered. Contact:**

**DALAL ART STUDIO**

42, Kennedy Bridge, Bombay-4.







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दर्शन घडविणाऱ्या अर्थपूर्ण अनुभवाने कथात्मक लयबद्ध रूप धारण करण्याची केलेली धडपड असते. कामप्रेरणेच्या अनेक अवस्था व तिच्या अनेक पाकळ्या रंगवण्याचा तो धिटाईने प्रयत्न करतो. हा प्रयत्न नेहमीच साधतो असे नाही. यशाचे मापही कमी–अधिक पडते. गेल्या वर्षी एखाद दुसरी का होईना चांगली कथा देऊ शकले पानवलकर, शरच्चन्द्र चिरमुले, विजया राजाध्यक्ष व आनंद यादव अपेक्षित उंची गाठू शकले नाहीत. या उलट एखाद दुसरी चांगली कथा लिहिणारेही काही आहेत. सदानंद रेगे यांची 'सत्यकथे'मधली 'अॅलीस आय् लव्ह यू' ही कथा जयवंत दळवींची 'वीणा'मधली 'मार्गस्थ' विद्याधर पुंडलीकांची 'सत्यकथे'तील 'वाटा' व 'मौज'मधली 'भिंत' या सर्व कथा विशेष लक्षात राहतात. विजय तेंडूलकरांनी 'नंदा'मध्ये सांगितलेली एका घराची (आणि त्यातल्या माणसांचीही) कहाणी अगर दिलीप चित्र्यांची 'राजहंस'मधली 'स्कॉर्पिओ' व वामन प्रभूंची 'मराठवाडा'मधली 'अंधार' ही कथा – या सर्व कथा वाचनीय आहेत. इंद्रायणी सावकारांची 'हंस'मधली 'मिशनरी' कथा ऐसपैस असली तरी लक्षात राहण्यासारखी आहे. या नांवलौकिक कमावलेल्या कथालेखकांबरोबरच यंदा मधुकर त्र्यंबक देव, चंद्रकांत वर्तक किंवा रमेशचंद्र पाटकर या ताज्या दमाच्या लेखकानीही चांगल्या कथा लिहिल्या आहेत.

यंदाही काही मासिकानी कथा स्पर्धा लावल्या. त्यात निवडलेल्या कथांचा दर्जा समाधानकारक नाही. प्रसादाच्या कथास्पर्धेसाठी हजारावर कथा आल्या. त्यातल्या वीस परीक्षकानी निवडल्या. त्यापैकी 'पाळणा' 'खेकडा' व 'भिजाणे' उल्लेखनीय आहेत. लेखकांची नांवे न देता छापलेल्या या कथांमधून अखेर वाचक निवड करणार आहेत. दुर्दैवाने, वाङमयगुण असलेल्या पण य. गो. जोशींच्या घरंदाज सात्विक कथांच्या परंपरेला बट्टा लावणाऱ्या कथा आपण निवडल्या नाहीत असे परीक्षकांनीच सांगितले आहे. स्पर्धा लावणाऱ्या मासिकाची संस्कृती व धोरण लक्षात घेऊन कथा लेखकांनी कथा पाठवायला हव्या होत्या, अशी वर त्यानी मल्लीनाथी केली आहे. असले वाङमयबाह्य निकष लावून कथांची पारख करणाऱ्या सूज्ञाविषयी अधिक काय बोलाव?

● ● ●

## कै. गोपाळकृष्ण भोबे स्मारक निधी समिती

सुप्रसिद्ध मराठी लेखक, संगीतातले एक दर्दी जाणकार, चित्रकार आणि दीपावलीचे एक सहृद् कुटुंबिय श्री. गोपाळकृष्ण भोबे यांचे जांबावली येथे फेब्रुवारी १९६८ मध्ये दुःखद् निधन झाले. त्यामुळे त्यांच्या कुटुंबियावर तर दुःखाची कुऱ्हाडच कोसळली आहे. अशा परिस्थितीत कै. भोबे यांच्या कुटुंबियाना आर्थिक सहाय्य करण्यासाठी म्हणून पद्मश्री वसंत देसाई यांच्या नेतृत्वाखाली एक समिती स्थापन करण्यात आली असून त्या समितीने प्रत्यक्ष कार्याला सुरुवातही केलेली आहे. या समितीमध्ये मुंबापुरीतील मान्यवर संस्था, साहित्यिक, चित्रकार, संगीतनट, गायक इत्यादी मंडळी सहभागी झाली आहेत. श्री. रा. वा. नायक व सौ. प्रफुल्ला डहाणूकर समितीच्या संयुक्त चिटणीस असून श्री. अरविंद पारेख व श्री. वामनराव देशपांडे खजिनदार म्हणून जबाबदारीने लक्ष घालणार आहेत.

ही कै. भोबे स्मारक निधी समिती संगीताचे कार्यक्रम सादर करणार असून त्याद्वारे जमा होणारी रक्कम व कै. भोबे यांच्या आप्त–मित्र–हितचिंतकांकडून लाभलेले आर्थिक सहाय्य एकत्रित करून त्यांच्या कुटुंबियाना देणार आहे.

आमच्या दीपावली कचेरीत कै. भोबे यांच्या निधनानंतर महाराष्ट्रातील व गोव्यातील अनेकांनी प्रत्यक्ष भेटून व कित्येकानी पत्रे पाठवून भोबे कुटुंबियाना आर्थिक सहाय्य देण्याची इच्छा प्रगट केली आहे. त्या सर्वांना आमची नम्र विनंती अशी की त्यांनी आपला निधी, **भोबे स्मारक निधी समिती** या नावाने पुढीलपैकी कोणत्याही एका कार्यालयाकडे लौकरात लौकर पाठवून द्यावा:

(१) भोबे स्मारक निधि समितीः–जहांगिर आर्ट गॅलरी, म्युझियम कंपौंड, मुंबई १ (२) दि गोवा हिंदू असोसिएशन, लॅमिंग्टन रोड, गिरगांव मुंबई–४ (३) संपादक दीपावली, दीपावली कार्यालय ४०–४२ केनेडी ब्रिज, गिरगाव, मुंबई–४

दीपावली कचेरीकडे आलेला निधी मुख्य स्मारक निधीकडे पाठविला जाऊन त्याची रीतसर पावती पाठविली जाईल व त्यांची नावे दीपावलीत प्रसिद्ध केली जातील.

––संपादक 'दीपावली'








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# १९६७

## दिवाळी अंकांतील विनोद

—शां. शं. रेगे

**यंदाच्या** दिवाळी अंकातील विनोदी साहित्य, व्यंगचित्रे व एकांकिका ह्याचे परिशीलन करण्यासाठी मला जेवढे अंक उपलब्ध होऊ शकले ते सर्व अंक मी तपासले. माझ्या हाती लागलेल्या १४८ दिवाळी अंकांचे ठोकळ वर्गीकरण करता घाऊक व फुटकळ विनोदी असे सुमारे ५६ अंक आढळले तर अविनोदी अंतरंगाचे ९२ अंक निघाले. काही मासिकानी अभावितपणे विनोद करण्याचा प्रयत्न केलेला आढळला. एका मासिकाने मुखपृष्ठावरील चित्र उलटे छापून महाराष्ट्रीय तरुणीला गुजराती वेषात सादर करून संस्कृतिसमन्वयाचे पुण्य जोडले. दोन मासिकानी अर्ध्या कथा छापून पुढील अंकाचा खप निश्चित करण्याचे व्यवहारी धोरण संभाळले.

घाऊक विनोदी अंकात प्रमुखपणे मोहिनी, आवाज, बुवा व जत्रा ह्यांचा उल्लेख अपरिहार्य आहे. फुटकळ विनोदी अंकात दीपावली, हंस, वसुधा, शामसुंदर, बागेश्री, पैंजण, प्रपंच, लोकसत्ता हे उल्लेखनीय आहेत तर वसंत, नवयुग, वीणासारखे एकेकाळी उदरविदारक म्हणून गणले गेलेले अंक यंदा हृदयविदारक झालेले आढळतात. गेली दोन वर्षे फक्त निवडक विनोदी साहित्याने नटलेल्या 'विनोद' वार्षिकाचा यंदा अवतार समाप्त झालेला दिसतो. तसेच दिवाळी अंकात उल्लेखनीय ठरलेला 'रत्नदीप' यंदा प्रसिद्ध झाला नाही ह्याची खंत वाटते.

यंदाच्या विनोदी साहित्यात लेखापेक्षा कथांवरच भर दिलेला आढळतो. विनोदी स्वरूपाच्या लेखमालिका 'गांवकरी' व 'दीपलक्ष्मी'मध्ये आढळतात. 'गांवकरी' मधल्या 'लाल फीत' मालिकेत वि. आ. बुवांचा 'वैताग' खुसखुशीत आहे. त्याच अंकातल्या 'घेराओ' मालिकेत द. मा. मिरासदारांनी लिहिलेला 'गाढव आणि घेराओ' हा त्यांच्या अभिजात विनोदी लेखनाचा चांगला नमुना आहे. 'दीपलक्ष्मी'मधल्या 'जावे त्याच्या वंशा' ह्या मालिकेत जयवंत दळव्यांचा 'संपादक', राजाराम हुमण्यांचा 'कारकून' आणि मिरासदारांचा 'प्राध्यापक' हे नमुनेदार वंशज वाटतात. इतर विनोदी गद्यलेखनात पु. ल. देशपांड्यांचा 'मौजेत'ला मराठी वाङमयाचा (गाळीव) इतिहास' 'आवाज'मधली कुणा अनामिकाची 'मुंबई नगरी बहु बांका' 'ललित'मधली ठणठणपाळांची 'विराट दंगल' आणि बुवामधली चा. र. शहाण्याची 'जनता वाचन पाठमाला' हे लेख कल्पनावैचित्र्य, भाषाप्रभुत्व आणि उपहासगर्भ लेखनाचे आदर्श ठरावेत; किंबहुना यंदाच्या विनोदी साहित्यातले सर्वोत्कृष्ट असे हे लेख आहेत असे कुणाही रसिक वाचकाला वाटेल.

विनोदी कथांची विषयवारी केली तर ग्रामीण जीवन, साहित्यिक रीतभात, सरकारी अनागोंदी, महिलामंडळाची वाटचाल, राजकारणी डावपेच, कौटुंबिक संघर्ष हेच जुने विषय पुन्हा एकदा हाताळलेले आढळतात. क्वचित्, एखाद्या समर्थ अथवा प्रेरित लेखकाने ह्या विषयाना नवीन वळण लावलेले आहे असे आढळते. बाकी सारा तोचतोचपणा आणि शिळ्या कढीला पुन्हा एकदा फोडणी असा प्रकार आढळतो. परकीय वाङमयातील कल्पनांची, कथानकाची किंबहुना संपूर्ण कथेची उसनवारी करण्याचे प्रयत्नही आढळतात. शामराव ओक किंवा प. गं. सुर्वेसारखे प्रामाणिक लेखक तसा स्पष्ट उल्लेख करून ऋण मान्य करतात. बाकीचे आपलेच नांव शिरोधार्य ठेवून मानधनाचे मानकरी होतात. यंदा ह्यापैकी एका कथेत 'डायलेमाची शिंगे' हा शब्दप्रयोग आणि 'मांजर बॅगेतून बाहेर आलं' हे वाक्य आढळले. एवढ्या बोलक्या पुराव्याने गुन्हा सिद्ध होत असताना आणखी संशोधन करण्याची आवश्यकता नाही. आन्द्रे मोर्वाच्या 'थॉट रिडींग मशिन'चा उपयोगही एका नामवंत लेखकाने केलेला आहे. सूज्ञास अधिक सांगणे नलगे.

ग्रामीण पार्श्वभूमीवर यंदा काही चांगल्या कथा वाचायला मिळाल्या. ह्या सर्वात उत्कृष्ट म्हणजे लोकसत्तेच्या स्पर्धेत पहिले पारितोषिक मिळालेली प्र. न. देशपांडे ह्यांची 'ग्रामीण संस्कृती' ही कथा. लेखकाचे नाव विशेष गाजल्याचे कधी स्मरत नाही. पण संयमपूर्ण लेखन, कसदार भाषाशैली आणि उपहासगर्भ घटनांची रेखीव बांधणी ह्या गुणविशेषानी ह्या कथेला एक चांगला दर्जा प्राप्त झाला आहे. यंदाच्या इतर उल्लेखनीय ग्रामीण कथा म्हणजे रा. रं. बोराडेंयांची 'बुवा'मधली 'तालीम', हसमनीसांची 'रत्नप्रभा'मधील 'हिकमत', गोवईकरांची 'दीपावली'तील 'चुकभूल', शंकरराव खरातांची 'साधना' मधील 'योगायोग', वसंत

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कुंभोजकरांची 'लुसकानकी' ह्या होत. कोकणच्या पार्श्वभूमीवर यंदा काही उल्लेखनीय कथा वाचायला मिळाल्या. गेल्या वर्षी 'वसुलीची पैज' लिहिणाऱ्या पंढरीनाथ रेग्यांच्या 'दीपलक्ष्मी'त 'सावळोबा मास्तराची (सत्व) परीक्षा' आणि 'आवाज' मध्ये 'दादूच्या लग्नाचे रहस्य' ह्या कथा चांगल्या आहेत. त्याशिवाय पुरुषोत्तम धाक्रसांची 'केदार' मधील 'निशाणी अंगठा', त्याच अंकातील विजया कामत ह्यांची 'कोंकणी डावपेच' ह्या कथाही उल्लेखनीय आहेत. पण ह्याशिवाय सूक्ष्म विनोददृष्टि आणि मार्मिक स्वभावचित्रणामुळे विशेष रंगतदार वाटलेल्या कथा म्हणजे जयवंत दळवी ह्यांची 'वागेश्री' मधील 'अंकुशाचे पौष्टिक उपाय' आणि S. T. समाचार मधील विद्याधर कामत ह्यांची 'पांडू मुंबहून येतो.' बालशिक्षण आणि बालमानसशास्त्र ह्या विषयावर आधारित उपरोधपूर्ण आणि मार्मिक चित्रण द. पां. खांबेटे ह्यांच्या 'हंस' मधल्या आणि पु. भा. भाव्यांच्या 'मोहिनी' मधल्या कथांत आहे. साहित्यिक पार्श्वभूमीवर लिहिलेल्या कथांत पु. ल. देशपांडे ह्यांची 'दीपावली'तील 'एकेकाचं मराठी' ही सोन्या बागलाणकराची कथा खुमासदार आहे. ह्या नाट्यपूर्ण कथेचं त्यांनी जर प्रगट वाचन केलं तर तिची रंगत अधिकच वाढेल. रमेश मंत्र्यांनी 'वागेश्री' मध्ये 'साहित्यिक पुळकवणी' लिहून 'आमचा पण गाव' सांगणाऱ्या दूरान्वयी साहित्यिक श्रेष्ठत्वाचा चांगलाच उपहास केलेले आहे. महिलामंडळाच्या कार्यबाहुल्यावर पु. भा. भावे ह्यांनी पैंजणमधल्या 'विनयभंग' ह्या कथेत कठोर प्रहार केलेले आहेत पण त्यातही त्यांची मिस्कील आणि अट्टाहासपूर्ण निवेदनशैली विलसताना आढळते. सुमन भडभडे ह्यांची 'ललना'मधील 'मी नाटककार कसा झालो' ही कथाही महिलांनी घरचा अहेर म्हणून गोड करून घ्यावी. सरकार आणि सचिवालय हे काही विनोदी लेखकांचे आवडते विषय आहेत. बाळ सामंतांनी मोहिनीत लिहिलेली 'स्वर्गात मद्यपानबंदी' ही रुपकात्मक कथा, आणि 'लोकसत्ते'तील रमेश मंत्री ह्यांची 'सरकारला विनोदबुद्धि असते काय', ही प्रत्ययकारी चर्चा सरकारला उद्बोधक ठराव्या अशी अपेक्षा आहे.

यंदाच्या दिवाळी अंकात काहींची हजेरी अभावाने जाणवली तर काहींची उपस्थिति प्रभावाने सवंग ठरली. गेल्या वर्षी अनेक दर्जेदार कथा लिहिणाऱ्या वसंत सबनीसांनी 'सुगंध'मधल्या एका नाटिकेशिवाय यंदा काहीच लिहिले नाही. आचार्य अत्रे, काणेकर, मं. वि. राजाध्यक्ष ह्यांनी सक्तीने किंवा नाईलाजाने लिहिले पण ते त्यांच्या कीर्तीला प्रस्तुत न ठरणारे. शामराव ओक हल्ली 'चोरबाजारातील चिजां'वरच साहित्यव्यापार करीत असतात. डॉ. वर्टींच्या 'दंतकथां'ची सर त्यांच्या अलिकडच्या विनोदी लेखनाला येत नाही. पु. ल. देशपांडे ह्यांनी यंदा फारच थोडे लिहिले आहे आणि त्यातले काही साहित्य पाल्हाळामुळे कंटाळवाणे झाले आहे.

अनेक दिवाळी अंकात हुकमी विनोदी लेखक म्हणून अपरिहार्य ठरलेल्या लेखकांपैकी जयवंत दळवी ह्यांच्या 'वागेश्री'तील कथेव्यतिरिक्त 'हंस' आणि 'साधना'मधल्या कथा, रमेश मंत्री ह्यांच्या 'मोहिनी', 'बुवा' आणि 'दीपावली'तल्या कथा, बाळ गाडगीळ ह्यांची लोकसत्तेतील 'आम्हांला समुद्र मिळालाच पाहिजे' आणि 'आवाज' मधील 'कौल' ह्या कथा, इंद्रायणी सावकार ह्यांची 'वागेश्री'मधील 'सोन्याची खाण', पु. व. काळे ह्यांची 'लोकसत्ते'तील 'पांढरा हत्ती तोहि लोकांचा' आणि राजाराम हुमणे ह्यांची 'बुवा' मधली 'जेव्हा व्याधाची बाधा होते' ही शिकार-कथा त्या त्या लेखकांच्या विनोदी प्रतिभेचे कसदार नमुने आहेत. वि. आ. बुवा तर यंदा जावे तिथे आणि जाऊ नये तेथेही भेटले, 'मोहिनी' मधला 'बंडू पळसुले' व 'S. T. समाचार'मधील 'अशा प्रकारे मी राजा झालोच' ह्या त्यांच्या कथा रंजक आहेत पण ह्याहीपेक्षा 'विशाखा'मधील 'वाघसाहेब शेळी झाले' ही कथा बुवांच्या सर्वस्पर्शी, मार्मिक आणि शैलीदार लेखनाचा एक उत्कृष्ट नमुना आहे.

ज्यांच्या विनोदी लेखनाबद्दल विशेष अपेक्षा बाळगता येतील असे माफक लिहिणारे जे लेखक आढळले त्यात मधुकर सातारकर, मोहिनी निमकर, भास्कर पागनीस, बापू कुंभोजकर, प्रभा पार्डीकर व वैजयंती काळे ह्यांचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. प्रस्तुत परीक्षणासाठी गंभीरपणे वाचून काढलेल्या १४८ अंकातले विनोदी साहित्य चाळून पाहताना वर उल्लेख केलेले तीस चाळीस दाणेच हाती लागले आणि अधिकांश उरली ती फोलपटे. ह्यावरून यंदाचे पीक कसदार नाही हे ह्या अव्यापारेषु व्यापाराचे तात्पर्य समजावे.

लिखित विनोदाचे समीक्षण केल्यानंतर रेखांकित विनोदाबद्दल थोडेसे बोलणे इष्ट आहे. व्यंगचित्रे हा दिवाळी अंकाचा आत्मा होय असे एकेकाळी मानले जात असे. पण अलिकडे ब्लॉक करण्याचा खर्च वाढल्यामुळे ह्या विनोदी प्रकाराची उपेक्षा होत चालल्याचे आढळते. शिवाय पूर्वी फुकट व्यंगचित्रे पाठविणारे चित्रकार अलिकडे मानधनाचे हिशेब करू लागल्यामुळे व्यवहारी संपादकाला ह्या खर्चिक उपक्रमापेक्षा जाहिरातीची सजावट जास्त उपकारक वाटू लागली आहे. मराठी व्यंगचित्रण वरच्या दर्जाचे आहे, हे गेल्या कित्येक वर्षांच्या अनुभवावरून सहज सिद्ध करता येईल. शि. द. फडणीस, वसंत सरवटे व चंद्रशेखर पत्की ह्यांनी सशब्द व्यंगचित्रे तर रेखाटली पण मासिकांची तिरंगी मुखपृष्ठे कल्पनारम्य सजीव आणि सुस्पष्ट रेखाटनानी बोलकी करून विनोदाला एक नवीन वळण देण्याचे श्रेय प्राप्त केले हे कुणालाही नाकारता येणार नाही. यंदाच्या काही दिवाळी अंकाची मुखपृष्ठे ह्या विधानाची साक्ष देण्यास पुरेशी आहेत.

यंदा व्यंगचित्रांचे विविध प्रकार आढळले. राजकीय व्यंगचित्रे दीपावली, आवाज, मराठा, इंद्रधनुष्य ह्या अंकात अनुक्रमे दलाल, माधव फडके, श्याम जोशी आणि शि. द. फडणीस ह्यांनी चितारलेली आहेत. पण ह्या अनेक चित्रमालांना सुडौल रेखाटना-




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

वरोवर भेदक कल्पकतेची जोड नसल्यामुळे ती परिणामकारक ठरू शकली नाहीत असे खेदाने म्हणावे लागते. व्यंगचित्रमालांचे उपक्रम अनेक अंकात हाताळलेले आढळतात, त्यापैकी उल्लेखनीय प्रयत्न म्हणजे सरवटयांची 'मौजे'तील 'वन् वे स्ट्रीट' आणि 'वीणा' मधील 'भारत पहा' पोस्टर्स. ही दोन्ही रेखाटने सूक्ष्म उपरोधपूर्ण कल्पनांनी परिपूर्ण असल्यामुळे सामान्य प्रेक्षकाला त्यांचे रसग्रहण करणे कठीण जाईल. पण 'लोकसत्ते'तील 'असेही नाटचप्रयोग' ही चित्रमाला जशी परखड आहे तशी सहज आकलनीय आहे त्यामुळे सर्वांना ती आवडेल यात संदेह नाही. शशिकांत गद्रे ह्यांनी 'बागेश्री' मध्ये निगेटिव्ह चित्रांची माला आणि 'आवाज'-मध्ये 'वेकारीवरील राजा मार्ग' दर्शविणारी माला रेखाटली आहे. ह्या दोन्ही आपापल्यापरीने वैशिष्टचपूर्ण आहेत. श्याम जोशी ह्यांनी 'प्रपंच'मध्ये रेखाटलेली 'वाचनमाला'ही उपरोधिक रेखाटनाचा एक चांगला नमुना आहे. मंगेश तेंडुलकरांनी 'दीपावली'मध्ये 'अहा भारत विराजे', 'लोकसत्ते'मध्ये 'साडचासाती' व 'मोहिनी'मध्ये 'नवे जग नवे शोध' ह्या व्यंगचित्रमाला रेखाटल्या. तेंडुलकरांच्या व्यंगचित्राच्या कल्पना तल्लख असतात इतक्या की पुष्कळदा त्यांच्या चित्रणाला कल्पनेशी तद्रुप होताना सायास पडतात असे प्रत्ययास येते. श्री. भि. अभ्यंकरांची 'लोकसत्ते'तील 'जग ही रंगभूमी आहे' ही चित्रमाला नाविन्यपूर्ण आणि प्रत्ययकारी आहे. पण ह्या सर्वांपेक्षा कल्पना, रेखाटन आणि अर्थवाहकता ह्यात वैचित्र्य दर्शविणारीऱ्या व्यंगचित्रमाला मीरा कंटक, ह्या विशेष परिचित नसलेल्या व्यंगचित्रकर्तीने रेखाटल्या आहेत. 'असे हे नवरे', 'अशा ह्या बायका' ह्या 'लोकसत्ते'तल्या त्यांच्या चित्रमालांचा आणि 'अनुराधा' मधल्या 'मुलाखती', 'रुचिपालट' व 'केशरचना' ह्या तीन चित्रमालांचा गौरवाने उल्लेख करावा लागेल. फुटकळ व्यंगचित्रणात उल्लेखनीय अशी चंद्रशेखर पत्की ह्यांची 'आवाज'मधील; सरवटयांची हंस, मोहिनी व S. T. समाचार मधली, सुधीर बावकर ह्यांची 'दीपावली' व 'लोकसत्ता' ह्या अंकामधील, मोहन रेळे ह्यांची 'केदार'मधील, बाळ राणे ह्यांची 'हंस'मधली, गवाणकरांची 'मोहिनी'मधली, प्रभाकर ठोकळ ह्यांची 'मनोहर' व 'हंस' मधली आणि बोरगांवकराची 'वाङमय-शोभा' 'वसंत' व 'हंस' मधली आणि रमेश कलोनी ह्यांची वाङमय-शोभेतली. ही सर्व त्या त्या व्यंगचित्रकारांच्या वैशिष्टचपूर्ण शैलीचे उत्कृष्ट नमुने मानता येईल. क्वचित एखादेच पण वैशिष्टचपूर्ण कल्पकतेने रेखाटणाऱ्या व्यंगचित्रकारात खास उल्लेखनीय असे वाङमय शोभेतील 'चंद्रावर स्वार झालेल्या भित्र्या नवऱ्याचे' आणि 'विशाखा'मधले मालकाच्या तोंडात बॅटरी कोंबून चोरी करणाऱ्या चोराचे श्रीकांत रानडे ह्यांचे. दिवाळी अंकातील ह्या रेखांकित विनोदी साहित्याचे समीक्षण करताना शब्दांकित साहित्यापेक्षा ते कितीतरी उजवे, वैशिष्टचपूर्ण, स्वतंत्र कल्पकतेने नटलेले आणि नवनवीन प्रयोगानी साकारलेले आढळते. ही परंपरा अशीच टिकून राहिली तर मराठी विनोदी साहित्यास ह्या अभिनव वाङमयप्रकाराची चांगली जोड मिळून त्याला अधिक जोम येईल अशी आशा प्रगट करण्यास हरकत नाही.

★ ★ ★


वाचक हो ! वाचा ! वाचा !!

दीपावलीची

रौप्य महोत्सवी वर्षाकडे यशस्वी वाटचाल

☆ कादंबरी स्पर्धा ☆

# एक हजार रुपयाची बक्षिसे

'दीपावली'च्या १९६८ च्या दिवाळी अंकासाठी आम्ही पुढील योजना सहर्ष जाहीर करीत आहोत.

- या कादंबरी स्पर्धेकरिता विषयाचे बंधन मुळीच नाही.
- कादंबरी स्वतंत्र हवी. अनुवाद, रूपांतर, मूळ कल्पना परकीय वगैरे मुळीच नकोत.
- पहिल्या दोन निवडलेल्या कादंबऱ्याना अनुक्रमे ६०० रु. व ४०० रु. ची पारितोषिके देण्यात येतील.
- छापलेल्या कादंबऱ्यांचे पुस्तक प्रकाशनाबाबतचे अधिकार लेखकाधीनच रहातील.
- परीक्षकांचा निर्णय अंतीम राहील. एखाद्या क्रमांकाला योग्य अशी कादंबरी न आल्यास ते पारितोषिक रद्द करण्याचा अथवा विभागून देण्याचा अधिकार परीक्षकांचा राहील.
- परीक्षकांचा निर्णय 'दीपावली'च्या ऑक्टोबर १९६८ च्या अंकात जाहीर केला जाईल व निवडलेली प्रथम क्रमांकाची कादंबरी दिवाळी अंकात व दुसऱ्या क्रमांकाची वर्षारंभ अंकात प्रसिद्ध केली जाईल.
- कादंबरीसाठी आकार बंधन २०००० ते २५००० शब्द.
- कादंबरी पाठविण्याची शेवटची मुदत – ३० जून १९६८.
- ही कादंबरी स्पर्धा सर्वानाच खुली आहे. परंतु प्रत्येक स्पर्धकाने आपल्या हस्तलिखितासोबत परतीसाठी व निर्णयासाठी एक रुपयाचे पोस्टेज लावावे.
- हस्तलिखित पाठविण्याचा पत्ता – दीपावली कार्यालय, ४०–४२ केनेडी ब्रिज, गिरगाव, मुंबई – ४.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

व्यक्तींना जोशी (उत्तम नकलाकार असूनही) वेगवेगळे व्यक्तित्व देऊ शकलेले नाहीत. गंगोवातात्या, रामजी, श्रीमति, ह्याच पात्राना काही वेगळेपण लाभले आहे. राघोबा, रामशास्त्री, रास्तेमामा, बापू, माधवराव पेशवे, रमाबाई, गोपिकाबाई इत्यादि पात्रे आपल्याला भेटतात. पण ती सारी एकसूर (काही ठिकाणी आचार्य अत्र्यांचा सूर) घेऊनच भेटतात. सदानंद जोशानी ह्या व्यक्तीना काही वेगवेगळा 'मॅनरिझम्' दिला तर आहे त्याही स्वरुपात सदर कार्यक्रमाची रंगत खात्रीने वाढेल. ह्या कार्यक्रमाचे आणखी एक वैशिष्टय म्हणजे ह्यात 'खचून' नाटच आहे. तीन्ही अंकांचे 'ड्रॉप्स' अशा नाटचपूर्ण व उत्कंठा वाढविणाऱ्या ठिकाणी योजिले आहेत. हे कौशल्य निवेदकाचे आहे. त्याचे श्रेय देऊन टाकूया. हे नाटच फुलविताना जोशी त्यात रंगून जातात. विशेषतः भावना हेलावून टाकणारा पहिल्या अंकातील शेवटचा प्रवेश, रास्तेमामाना शिक्षा दिल्यानंतर गोपिकाबाई निघून जातात तो प्रवेश, राघोबाची मैफल, थेऊरच्या गणपतीजवळ फक्त चार वर्षे आयुष्य द्या म्हणून मागणारा प्रवेश, कुंकवाचा डाग घेऊन सदरेत जायला माधवराव निघतात तो प्रवेश, मृत्यूपूर्व निवेदन ह्या प्रसंगातून ते प्रेक्षकांना बांधून ठेवतात. चाळीशी ओलांडलेल्या जोशाना विशीपंचवीशीची भूमिका करावी लागते. शरीर (यष्टी) नसल्यामुळे ते 'श्रीमंत' वाटत नाहीत वगैरे मुद्दे निदान मराठी रंगमंचापुरते तरी बादच करायला पाहिजेत असे मला वाटते. कारण व्यक्तित्व आणि कलागुण घेऊन येऊन 'नटवर्य' झालेली माणसे एकूण कमीच ! जे आहे त्याचा कस लागला की काही हा विचार महत्वाचा. जोशी आजवर करीत आलेले कार्यक्रम आणि हा कार्यक्रम ह्यात एक मूलभूत फरक आहे. आजवर काम (मुख्यतः) आवाजाचे होते. 'ब्या'-सारखे बोलले की काम भागे. ह्यात त्यांच्या अंगी अभिनय (असल्यास) कितपत आहे ह्याची कसोटी होती. सर्वच ठिकाणी जोशी 'न्याय' देऊ शकेल नाहीत. तीन साडेतीन तास दहा पंधरा व्यक्ति सादर करताना 'दमछाक' होते. काही ठिकाणी मग एक-सुरीपणा येतो. पण पाठांतर पक्के व नाटचही निवडक, वेधक व बांधून ठेवणारे यामुळे प्रेक्षक सतत 'टॉस' होत राहतो.

पार्श्वसंगीत, गझल, अभंग, साऊंड इफेक्टस् आदि गोष्टींचा कलापूर्ण उपयोग ह्या प्रयोगात करण्यात आला आहे. सुधीर फडके आणि किशोरी आमोणकर यानी आपली कामगिरी चोखपणे बजावली आहे. पुण्याला शनिवार वाड्यातल्या गणेश महालाचा सेट मांडला जातो. तसा सेट मुंबईला कां नव्हता ? त्यामुळे रंगत वाढली असती असे वाटते (हे बजेट प्रकरण एकूण वाईटच आणि आमचे गणित पडले कच्चे) दाते म्हणाले (आपले केशवराव) त्याप्रमाणे सदानंद जोशी नकलाकडून आता 'नाटचा'कडे वळले आहेत. "स्वामी" त्याना उदंड यश देवो सदानंद जोशी हे ह्या प्रयोगाने मराठी रंगमंचावर अनेक अर्थानी नवे दालन उघडीत आहेत. ह्या कार्यक्रमातून रेडियो, चित्रपट व नाटच ह्या तीन्ही माध्यमांचा संयोग साधला गेला असून जुन्या शाहिरी परंपरेचेही पुनरुज्जीवन झाले आहे. ह्यातली कितीतरी (सच्ची) वाक्ये आजच्या राजकीय परिस्थितीला लागू पडतात. ती ऐकत असताना कलेच्या ह्या माध्यमाचे सामर्थ्य ध्यानी येते. काही (माध्यमाच्या व जोशांचाही) मर्यादा मान्य करूनही एक 'जिद्दी' कार्यक्रम म्हणून मी ह्या कार्यक्रमाचे स्वागत करतो.

## संथ ( छेः ! धो धो ) वाहते कृष्णामाई

सहाव्या महाराष्ट्र राज्य चित्रपट महोत्सवाचा 'निकाल' लागला. पण 'वावटळ' उठली नाही. (आता नाहीच उठायची. कारण? आमी सांगू न्हाई अन् तुमी इचारू न्हाई. ) **"संथ वाहते कृष्णामाई"** ह्या सहकारी चित्रपट संस्था, सांगली (जय सहकार) ह्या संस्थेने निर्माण केलेल्या चित्रपटाला १२००० रुपयाचे पहिले पारितोषिक (अक्षरशः) बहाल करण्यात आले आहे. कृष्णामाई (आपले नाव विसरून) धो धो वाहिली आहे.. 'पाटाचं पाणी' फक्त भोकरी गावालाच नव्हे तर अवघ्या संस्थेलाच भिजवून (व फुलवून) गेलं आहे. फरक इतकाच की तो पाट 'सहकारी' होता तर हा पाट 'सरकारी' आहे. शिवाय दिग्दर्शक श्री. मधुकर पाठक (रु. ३०००) गीतकार (दुय्यम दर्जाचे–इति चित्रे–वडेर) ग. दि. माडगूळकर (रु. ५०० ) संगीतकार दत्ता डावजेकर, पार्श्वगायक सुधीर फडके, आशा भोसले, सहाय्यक अभिनेता चंद्रकान्त (नायक कोण मग?) आणि ध्वनि-मुद्रक चव्हाण यानाही प्रत्येकी रु. ५०० ची पारितोषिके देण्यात आली आहेत (खुदा देता हैं तो ऐसा–छप्पर फाड़के! ) कुणाला तरी ती दरवर्षी मिळतातच. मिळावीतही. कारण मुळातच अपुऱ्या भांडवलानिशी काही 'चांगले' करण्याची जिद्द बाळगणारी आम्ही मराठी माणसे. तेव्हा 'कृष्णामाई'ला बक्षीस मिळाले. आमच्या माडगुळकरांना कथा–पटकथा–संवाद–गीते सबकुछ त्यांचे असून गीतकार म्हणून पारितोषिक मिळाले. आनंद! बहुत आनंद. आता सरकारी पारितोषिक मिळाले की पुस्तकांचा व चित्रांचा भाव वधारतो. पुस्तके खपतात (म्हणून तर परीक्षक-लेखक 'पदरी' बाळगावे लागतात) आणि चित्रपटाला 'धंदा' मिळतो. 'कृष्णामाई' ह्या चित्रपटाला मी गेलो आणि एक संपूर्ण लांबीची, सरकारी फिल्म्स् डिव्हिजनची, डॉक्युमेंटरी फिल्म पाहून घरी परतलो. 'संथ वाहते कृष्णामाई''ला सरकारी पारितोषिक कां मिळाले (असावं) ह्याचा शोध फारसं खोल (पाण्यात) न जाता लागला. 'सरकारी पारितोषिके' हा एक वेगळाच विषय आहे. पण ती वाटताना नेहमी काही कलाबाह्य गुणांचाच विचार कां केला जातो हे मात्र कळत नाही. स्वराज्याचं सुराज्य करण्यासाठी, कलेची सर्व साधने व माध्यमांचा विचार व्हावा इतपत ठीक. पण पारितोषिके








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




# स्वामी

## ( आणखी एक नवाच प्रयोग )



श्री. केशवराव दाते सदानंद जोशींचे मनःपूर्वक कौतुक करताना

**रंगभूमी** (अर्थातच मराठी) मेली, मृत्युपंथाला लागली, मराठी नाटक थिटे (का), मराठी नाटक मरणार नाही कारण मराठी माणसाच्या रक्तातच नाट्य असते (म्हणून तर भांडखोर मराठी माणूस अशी एक राष्ट्रीय (तथाकथित) शिवी खावी लागते आहे अलिकडे. (शिवसेनेची कृपा दुसरं काय ?) वगैरे चर्चा नेहमीच चालू असते (पंडिताना जगात नेहमीच चर्चेला 'विषय' लागतात) मराठी रंगभूमी चालते आहे. माणसे येतात, तिची 'सेवा' (उगीच आपली फॅशन) करतात. नवनवीन प्रयोग होत रहातात. त्या प्रत्येक प्रयोगातून 'प्रत्यक्ष' पाठ मिळतात. काही माणसे खचतात–पिचतात. 'नाटक झाले जन्माचे' असं म्हणण्याची पद्धत आहे. जन्म गेले तरी नाटके होतच आहेत. होतच राहतील. कारण नाटक ही 'सजीव' कला आहे. 'प्रवाही' कला आहे. ती तशी आहे ह्याची ग्वाही मराठी कलाकारांनी आपल्या प्रयोगातून सतत दिली आहे. मराठी प्रज्ञा 'वांझ' झाली नाही तोपर्यंत असे प्रयोग सतत होतच राहतील. त्याला कधी तुम्ही नाट्य म्हणा, न-नाट्य म्हणा, नवनाट्य म्हणा वा एकपात्री प्रयोग म्हणा. कादंबरी कथन म्हणा वा बहुरुपी प्रयोग म्हणा.

अशाच तऱ्हेचा एक नवा प्रयोग अलिकडेच पाहिला आणि कळविण्यास बहुत आनंद होतो की प्रयोग पाहण्यापूर्वीच्या कल्पना आणि प्रत्यक्ष ह्यामध्ये 'फारसा' फरक पडला नाही. 'फारसा' असं मी मुद्दामच म्हणतो कारण अपूर्ण मानवांच्या ह्या जगात (फार गंभीर होतय् का ?) परिपूर्ण असे काही नाही. 'शंभर टक्के' यशस्वी असं म्हणायची पद्धत आहे. पण ते आपलं जाहिरातीचं कसब. त्या प्रयोगाचं नाव होतं–'स्वामी'. सादरकर्ते सदानंद जोशी. (सदानंद थिएटर्सच्या सौजन्याने) आणि मूळ लेखक रणजित देसाई. त्यांच्याबद्दल आणि 'स्वामी' बद्दल (मूळ स्वामी व कादंबरी स्वामी) बहुत काय लिहिणे. राष्ट्रपतींनी त्यांचा गौरव केला. म्हणूनच हे शिवधनुष्य होते. त्यातही ही कादंबरी (शंभर टक्के तुफान वगैरे वगैरे) विनोदी नाही. विषय गंभीर. हसायचं म्हटलं तर श्रीमंतांचा अपमान (व शीघ्र कोप) त्यामुळेच हा प्रयोग करायचा असे जोशी यांच्या मना आले तरीही ते 'जनां' दिसायला मात्र दीड वर्ष लागलं. (असं ऐकतो) शेवटी पुणेरी बाबूरावांप्रमाणे (ओळखा) महाराष्ट्रातल्या तमाम तालुका गांवी भेटी देऊन 'स्वामी'नी अखेर तीन मार्चला मुंबईत आगमन केले. मुंबईतील तमाम मराठी माणूस (उगीच–आपली अलिकडची पद्धत) साहित्यसंघात डेरेदाखल जाहला होता. मुजरे झडले. 'निगा रख्खो' वगैरे घोषणा झाल्या आणि पेशव्यांची मसनद दिसू लागली.

सदानंद जोशी ह्यांच्या ह्या प्रयोगाला त्या माध्यमाच्याच काही मर्यादा आहेत. त्या जाणून घेऊन हा प्रयोग पाहिला पाहिजे. एकतर मराठी रंगमंचावरील अशा तऱ्हेचा हा पहिला प्रयोग आहे. ह्यापूर्वी कादंबरी वाचनाचे प्रयोग रंगमंचावर (रंगसज्जा नव्हती) झाले आहेत. पु. ल. दे. (एंका कोळियाने) श्री. ना. पेंडसे (रथचक्र) ह्या कलाकृतीचे वाचन त्या मंडळींनी केले (होते) परंतु सदानंद जोशींचे काम त्याहून अवघड होते. कादंबरी मोठी (छापील पृष्ठे ४३६) विषय गंभीर. कादंबरीने अपेक्षा उंचावलेल्या. कादंबरीशी इमान राखण्याची प्रतिज्ञा, चित्रपटासारख्या लोकप्रिय (व एका रात्रीत कीर्तिवंत करणाऱ्या) रुपेरी मोहाला लेखकाने नकार दिलेला. आणि "मी अत्रे बोलतोय" ह्या तशा 'लाइट' कार्यक्रमानंतर हा तसा प्रकृतीने गंभीर (आता माधवरावांचीच प्रकृती ती) कार्यक्रम ते सादर करणार होते. लेखकानेही त्याना तसा धोक्याचा इशारा दिला होता म्हणतात. 'रिलीफ' नाही. पण सदानंद जोशी ह्यानी ही सारी आव्हाने स्वीकारली आणि इमान राखून (कादंबरीचे व कलेचेही) कार्यक्रम सादर केला.

'स्वामी' साऱ्याना विदित आहेत (निदान स्वस्त आवृत्तीनंतर तरी) असे मी मानतो. स्वामीतले निवडक प्रसंग घेऊन व त्यांना जोडणारे असे सूत्रबद्ध निवेदन स्वतंत्रपणे लिहून काढून 'मी आहे कालपुरुष' अशी भूमिका स्वतःकडे घेऊन जोशी कार्यक्रम सादर करतात. ह्या कार्यक्रमाचे स्वरुप काहीसे एकसुरी आहे. निवेदक ती सारी कथा सागतो. आणि प्रसंग घडतात तेव्हा त्यातल्या काही व्यक्ति विविध रूप, रंग, आवाज, भाव घेऊन प्रगट होतात. काही म्हणण्याचे कारण ह्यातल्या साऱ्याच



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

वाटताना मात्र कलागुणाना जर प्राधान्य दिले नाही तर कलेवर अन्याय होईलच. पण प्रचारालाही पोरकट, उथळ स्वरुप प्राप्त होण्याचा धोका संभवतो. मग माणसे कलेपेक्षा आडाखे बांधतात व काही 'दाणे न देणारी कणसे' सर्वत्र उगवतात. "संथ वाहते कृष्णमाई" ह्या चित्रपटाची कथा ही अशीच 'बेतलेली' आहे. आडाखे बांधून (व बक्षिसावर लक्ष ठेवून–सरकारी बुइक पॉइंटवर ध्यान देऊन) रचलेली आहे. त्यामुळेच ती फारच ढोबळ व कृत्रिम झाली आहे. त्यातला प्रचार कृत्रिम, संघर्ष कृत्रिम–विरोध कृत्रिम आणि सारेच कृत्रिम, उथळ, ढोबळ, बटबटित असेच. दोन पिढ्यातल्या संघर्षाची कल्पना खरी, फार चांगली. पण 'जय किसान'चा नारा कानात घुमत असल्याने ती कथा खोलात शिरलीच नाही. जुन्या नेतृत्वाची 'देशमुखगिरी' ही जितकी वाईट तितकीच सहकारी दादा-गिरीही वाईट असे दिसून येते. नुसती माणसे बदलून चालत नाही, 'कॅरेक्टर' बदलावी लागते. धोके तर तेव्हाही होते आणि आजही (नव्या नावाखाली पण) आहेतच. शिवाय बरेच 'संदेश' एकाच चित्रपटात कोंबले गेल्यानेही कलात्मक 'तोल' टळला आहे. मात्र एक गोष्ट चांगली आहे. हे करताना निवडलेले प्रसंग पुष्कळसे वास्तव आहेत. (सरकारी दवाखान्यातल्या कॉटस् देशमुखांच्या व कारकुनाच्या घरी, अल्पसंख्याकाच्या भावनांचे भांडवल करणे, वगैरे) पण कोर्टाचा सीन वगैरे प्रकार हास्यास्पदच. इंजिनियर देशपांडे (राजा परांजपे) ह्या माणसाचे अर्धवट वेड 'रिलीफ'साठी बरे होते. चंद्रकांत (देशमुख) याना दिलेली भूमिका स्थूल व सांकेतिक वाटली. ह्या साऱ्या कथेबाबतच काहीसे असेच म्हणता येईल. सरकारी बक्षिसाचे "अनु-पान" जुळवून हे 'रसायन' तयार झाले आहे हे सारखे जाणवत राहते. खुनाचा तपास हा सारा प्रकार पोलिसी मठ्ठपणाचा (वा लाचखाऊपणाचा) वाटतो. ह्या प्रकरणातले मामलेदार आदि सरकारी अधिकारी किती कल्पनादरिद्री असतात हेही जाणवते. कॅप्टन (हात तुटका नव्हे–बांधलेला – चक्क दिसतो मंडळी) च्या रँकचा माणूस खुन्याचे नाव कळताच पोलिस चौकीत असूनही कायदा हातात घ्यायला धावतो हे चित्रणही तर्कसंगत वाटत नाही.

मग हे बक्षीस कसले? कशाबद्दल? सांगू? कृष्णामाईला जे पाट पाडले व भरपूर शेतं पिकली ह्या चित्रांबद्दल हे पारितोषिक! आता 'पाट' पाडले म्हणजे खर्च येणारच. भरून निघाला झालं!

चांगला भाग, टिकाऊ भाग म्हणजे डावजेकरांचे संगीत, सुधीर फडके व आशा भोसले यांचे पार्श्वगायन! त्यावर आपण फार खूष आहोत. विशेषत: संथ वाहते, गंगा आली रे, होसी काय निराश ह्या गाण्यांवर! प्रचारही असावा. पण अधिक कलापूर्ण असावा. त्यात 'गणिती' विचा-राला फारसे प्राधान्य नसावे. सरकारने काही निश्चित सिद्धांत मांडावेत. म्हणजे दरवर्षी ह्या विषयात जे वादंग माजते ते माजणार नाही. (आणि विशेष सूचना–असे प्रचारपट स्वतःच व स्वतंत्रपणे काढा-वेत. स्पर्धेसाठी त्यांचा समावेश केला जाऊ नये. स्वतंत्र अनुदाने द्यावीत. रक्कमेचे बंधनही मग राहणार नाही.)

**–चित्रगुप्त**


गंगाजळी 0·४0 कोटी रु.
ठेवीदार ४ लाख
कर्जदार १२०००
भागधारक ९०००
कर्मचारी २२००
शाखा ११९
ठेवी ८३ कोटी रु.
कर्जे ४० कोटी रु.
गुंतवणूक २२ कोटी रु.
भरणा झालेले भांडवल १·२१ कोटी रु.
M B
आपल्या सहकार्यानें १९६७ मधील प्रगती
दि बँक ऑफ महाराष्ट्र लि.
BM/88/4




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# 'स्वरराज' छोटागंधर्व

दी पा व ली ची




**कलावंताला** वय असलं तरी कलेला वय नसतं. ती नेहमीच चिरनव, चिरतरुण, अजर, अमर असते. म्हणून माणसे गेली तरी कला उरतेच. माणसे वाढली तरी कला 'शोडषा' राहते. स्वरराज छोटागंधर्व तथा सौदागर नागनाथ गोरे ह्या कलावंताविषयी असेच काहीतरी म्हणता येईल. छोटागंधर्व हे मराठी रंगभूमीचे विशेषत: संगीत रंगभूमीचे भूषण आहे असं म्हटल्याने त्यांच्या व्यक्तित्वाचा आलेख पूर्णपणे काढता आला असे होत नाही. कुठल्याही कलावंताचे असे (संपूर्ण) शब्दचित्र काढता येणे निदान मला तरी अशक्य वाटते. कलावंत हा सतत 'फुलत'च असतो. वाढतच असतो. (वयाने आणि कलेनेही) सौदागरना मी प्रथम रंगभूमीवर पाहिले ते १९४० साली. बालमोहन कंपनीचा महान गायक नट म्हणून सौदागरची त्यावेळी जाहिरात केली जात होती आणि ती खरीही होती. आचार्य अत्रे–बालमोहन –दामुअण्णा जोशी–सौदागर, कोरडे, धुमाळ, नागेश जोशी, बापूराव माने, ही त्यावेळची मोठी नावे! रंगभूमीचा तसा पडताच काळ म्हणता येईल. आचार्य अत्रे यांचे वंदे मातरम्, मी उभा आहे, लग्नाची बेडी, उद्याचा संसार, घराबाहेर, साष्टांग नमस्कार –ही व अशीच नाटके बालमोहनच्या रंगमंचावर मी पाहिली. सौदागर यांची संगीत भूमिका मी पाहिली व सुदैवाने संगीताचे कान असल्याने त्यांची जी 'प्रतिमा' मानावर कोरली गेली ती आजही डागळली गेली नाही हे आम्ही साभिमान नमूद करतो. सौदागर हे नाव त्यावेळी प्रामुख्याने लावले जात होते. आज 'छोटागंधर्व' हे विशेषणच 'विशेषनाम' झाले आहे. इतकी सौदागर आणि छोटागंधर्व ह्या दोन नावात एकरुपता सिद्ध झाली आहे. छोटागंधर्व हे ज्यावेळी मी प्रथम पाहिले तेव्हा अक्षरश: ते 'छोटे' होते आणि 'गंधर्व' तर होतेच होते. बालमोहनच्या नटसंचातली त्यांची मूर्ति मला अजूनही स्मरते. बालमोहनने मराठी रंगभूमीची फार मोठी सेवा केली. तिचे शिल्पकार दामुअण्णा जोशी हे स्वत: नुसतेच नट नव्हते तर कुशल संघटक व सुजन मालक होते. त्यानी जो संच जमविला त्यातली काही माणसे पुढे फार मोठी झाली. बापूराव माने हे आज पुरुष नट म्हणून कामे करीत असले तरी मान्यांचा सुवर्णकाल म्हणजे बालमोहनचा! नागेश जोशी, धुमाळ, हंसराज कोरडे, सौदागर ही मोठी नावे. बालमोहनचा जमाना संपला तरी धुमाळ, नागेश, सौदागर यांचा जमाना संपला नाही. नागेश नट–नाटककार झाला व 'कलाविकास'चा जन्म झाला. सौदागर, कोरडे ही सारी मंडळी तेथेही होतीच. 'देवमाणूस' हे सौदागरांच्या आयुष्यातले एक मोरपीस आहे असे मी मानतो. (तेही मानीत असतील). 'देवमाणूस' मधली त्यांची भूमिका तिहेरी होती. नट, कवि आणि संगीतकार!! त्यांची काव्ये आणि संगीत किती लोकप्रिय आहे हे सांगण्याची गरज नाही. चांद माझा हासरा, दिलरुबा मधुर हा, छळी जीवा दैवगती आदि गाणी आज मराठी घराघरातून म्हटली, ऐकली जात आहेत.

बालमोहन, कलाविकास नंतर मात्र 'कंपनी'चा जमाना संपला. 'नाईट'चा जमाना सुरू झाला. आणि छोटागंधर्व संगीत रंगभूमीचे अनभिषिक्त राजे झाले. आज ते 'ए-वन्' संगीत नट म्हणून गौरविले जात आहेत. जुन्या जमान्यातली मृच्छकटिक, मानापमान, सौभद्र आदि नाटके व नव्या जमान्यातील सुवर्णतुला (संगीतही त्यांचे) ह्यासारख्या नाटकांनी अभिजात संगीत नाटकातले त्यांचे स्थान मोठे केले आहे. **'रंगल्या रात्री अशा'** चित्रपटासाठी त्यांनी नाट्यसंगीताचा 'प्ले-बॅक' दिला आणि तो चित्रपट अल्लारखांचा तबला आणि छोटागंधर्वांचे गाणे ह्यामुळे गाजला. कथा चांगली होतीच (रणजित देसायांची) रसानुकूल गाणे हे त्यांचे वैशिष्ट्य! चाली देतांनाही त्यांचा हा दृष्टिकोन असतो हे वरील उदा. स्पष्ट दिसेल. आपल्याकडे गायक नटांना अभिनयाचे अंग असतेच असे नाही. सौदागर यांना ते अंग फार मोठे आहे. त्यांचा शेखर, पराग, चारुदत्त, धैर्यधर इत्यादि भूमिका साक्ष पटवितात.

सौदागर नागनाथ गोरे, जन्म कोरेगाव, जमात कोष्टी, एकेकाळचा नास्तिक, पण पाढांतराला पक्का, गाणारा खूप (चांगला) पण बोलणारा माफक, मनमिळाऊ, श्रद्धेने कलासाधना करणारा असा हा माणूस आता खूप धार्मिक व अध्यात्मपर वृत्तीचा झाला आहे. यज्ञ याग करतो. ध्यान धारणा करतो. तीर्थांना भेटी देतो. आणि मग सणावाराला रंग–तीर्थालाही भेट देतो. तो रंगमंचावर येणार असला की रसिकांना ती पर्वणी वाटते. लोक "यात्रा" करतात. दामुअण्णांनी मराठी रंगभूमीसाठी जी भौतिक कामगिरी केली तीत छोटागंधर्व – सौदागर हे एक नवे कोरे (पण कोरे नसलेले) 'फाइंड' त्यांनी दिले. संगीत नाटकां–



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

जेव्हा केव्हा इतिहास लिहिला जाईल तेव्हा काही 'मौलिक' पाने सौदागर नागनाथ गोरे (छोटागंधर्व) ह्या नावावर 'जमा' राहतील ही खात्री वाटते. आज ते वयाची पन्नाशी ओलांडीत असले तरीही त्यांची कला चिरतरुणच राहिली आहे अशी ग्वाही (मी कशाला?) त्यांचा आवाजच देत आहे. ह्या चिरतरुण गायकाचे अभिनंदन ! !

## 'साठी'चे सोपानदेव चौधरी

कलेला वय नसतं असं मी वर म्हटलं आहे. सौदागर याजप्रमाणे सोपानदेव चौधरी यांच्या बाबतही ते अक्षरशः खरे आहे. सोपानदेव चौधरी नाशिकचे. पण मूळ गाव जळगाव. खानदेशातले ते. पण कवि म्हणून त्यांची सारी (यशस्वी) कारकीर्द पाहिली ती मात्र नाशिकने. कविता करीत नाहीत. कविता होते असे म्हणतात. हे सूत्र चांगल्या कवींच्या काव्याबाबत जर खरे असेल तर सोपानदेवांना गेली चाळीस-पन्नास वर्षे कविता होते आहे. शाळेत असताना पासूनच त्याना ती होते आहे. वयाच्या १२-१३ व्या वर्षीच हा साक्षात्कार त्यांना (व त्यांच्या शिक्षकाना झाला) वर्ग चालू असतानाच त्यांना त्यांच्या शिक्षकाने पकडले. कागद हिसकावून घेतला व नंतर भेटायला सांगितले. भीत भीत ते त्याला भेटले. त्यानी स्वतःच ही कविता केली असल्याचे कळताच शिक्षकाने त्याना "शाबासकी"ची गोड शिक्षा दिली. ते म्हणाले "शाबास! मोठा कवि होशील तू! माझा आशिर्वाद आहे" ती शिक्षा व तो आशिर्वाद घेऊन सोपानदेव आज मराठीतील एक अग्रेसर कवि झाले आहेत. त्या कवितेचे शीर्षक होते. "गोकुळिचा कान्हा माझा पाहिलात काय ग?" कान्हयाच्या शोधात निघालेल्या ह्या गोपीला कृष्ण भेटला आहे. त्याने तिला मुरली दिली असली पाहिजे. त्या मुरलीचे सूर गोड-तिने भारून टाकले आहे मराठी मन. मनात भरला आहे सोपानदेव आणि त्यांची कविता !

सोपानदेवांचा वारसा तसा मोठा. प्रतिभेचा-प्रज्ञेचाच वारसा तो ! त्याची आई बहिणाबाई ही तशी निरक्षर-अशिक्षित बाई. पण तिची कविता ? शहाण्याशहाण्या (समजणारांनी) तोंडात बोटं घालावी अशी ! आईच्या कवितेविषयी त्यांच्या मनात नितांत आदर आहे. भक्ति आहे. ती मुखोद्गत करून व तिचा आशय अंतरात ठसवून घेऊन सोपानदेव आज नव्याजुन्यांच्या मेळाव्यात ताठ मानेने उभे आहेत. कारण बहिणाबाईप्रमाणेच "कविता होण्या"ची प्रक्रिया चालू आहे. वयाच्या तेराव्या वर्षी त्यानी 'झोक तोल तोल ग' (इशारा) ही कविता लिहिली. तिचे फार मोठे कौतुक कै. लक्ष्मीबाई टिळकांनी 'रत्नाकर' मासिकात परीक्षण लिहून केले. १९३२ साली 'काव्य-केतकी' ह्या नावाने त्यांच्या कवितांचा पहिला संग्रह प्रसिद्ध झाला. तो जमाना काव्यगायनाचा होता. सोपानदेव नुसतेच कवि नाहीत. संगीताचे दर्दी जाणकर आहेत. त्यामुळे काव्यगायनाच्या कार्यक्रमात आपल्या काव्याने व गायनानेही ते खूप लोकप्रिय झाले. आजही अनेक नव्या-जुन्या कवींबरोबर 'काव्य गायना'ची सुपारी ते घेतात. आणि 'रंगत' आणतात. १९३२ साली कोकण प्रांतीय साहित्य संमेलन ठाणे येथे भरले. आणि तेथे त्यांनी पहिले प्रगट काव्यगायन केले. १९६८ सालीही त्यांचा हा जोष कायम आहे. १९३२ साली पुण्यास भरलेल्या पहिल्या कविसंमेलनाचे त्यांचा खास बहुमान केला व रौप्यपदकही दिले. त्यानंतर मात्र त्यांची कीर्ति कस्तुरी गंधाप्रमाणे पसरली. १९३४ साली बडोद्याला झालेल्या १९ व्या मराठी साहित्य संमेलनात त्यांनी काव्यगायन केले तेव्हा मूळचे नाशिकचे, पण बडोद्याचे राजकवि झालेले चंद्रशेखर पुढे श्रोत्यात बसलेले होते. ते त्यांच्या काव्यगायनावर इतके खूष झाले. उस्फूर्तपणे म्हणाले "अरे, तुला तर महाराष्ट्राचा काव्य-कोकिळच म्हटले पाहिजे." आणि त्या दिवसापासून ते 'महाराष्ट्र काव्य-कोकिळ' झाले. सर्वोत्कृष्ट कवितेचे मानचिन्ह म्हणून त्याना एक सुवर्णपदक देण्यात आले. १९४७ साली मराठवाड्यात साहित्य संमेलन भरले. मराठवाडा म्हणजे मराठी संताचे माहेर घरच! "माझी मायबोली आली आज माहेराला" ही त्यांची कविता त्यांनी म्हटली. खूप गाजली. दादरला वसंत व्याख्यानमालेत स्वातंत्र्यवीर सावरकरांचे व्याख्यान झाले. त्याप्रसंगी सोपानदेवांनी त्यांची 'सागरास' ही कविता म्हटली. सावरकर खूष झाले. "त्यांची शाबासकी हा माझ्या आयुष्यातला सोन्याचा क्षण" असे अजूनही सोपानदेव म्हणतात.

सोपानदेवांची पिढी आज काव्य (व काव्यगायन) प्रांतातून निवृत्त झाल्यासारखी दिसते आहे. जुन्या नव्यांचा सांधा जुळविण्याचा काहीनी प्रयत्न केला. जुळला नाही म्हणून सोडून दिला. तर काही हास्यास्पद ठरले. पण सोपानदेवांची काव्याकडे व जीवनाकडे पाहण्याची वृत्ति प्रसन्न व सौंदर्यनिष्ठ असल्याने त्यांची कविता ह्या जुन्या-नव्याच्या संघर्षातही टिकून आहे. त्यांच्या मी ताक पितो, दगड धोंडसारख्या कविता तुफान लोकप्रिय झाल्या आहेत त्या त्यातल्या उपरोध, उपहासामुळेच! 'रक्त हे फक्त आहे' म्हणजे नेमके काय असा सवाल ते करतात तोही नवकवितेत येणाऱ्या निरर्थक शब्दांच्या सोसाचे विडंबन करण्यासाठीच. काव्याबद्दलची त्यांची भूमिका त्यांच्याच शब्दात देण्यासारखी आहे——श्वासांचेही होती शब्द. शब्द दाटले कवनी, निमित्ताला मात्र राही, शाई कागद लेखणी. 'श्वासांचे शब्द होतात' ही भूमिका त्यांची आहे. त्यांच्या आईची कविता वाचूनही हाच प्रत्यय येतो. शब्द, सूर आणि अध्यात्म ह्यात न्हाऊन निघालेली प्रत्ययकारी कविता म्हणजे सोपानदेवांची कविता. ही जाण त्याना आली कुठून? त्यांच्या सहवासात चार दोन तास घालविल्यानंतर ध्यानी येते ते हे की, ही कविता संताच्या काव्यावर पोसली गेलेली कविता आहे. ज्ञानेश्वरी-गाथा ह्यातून हा झरा पाझरतो आहे. बहिणाईच्या ओव्यातून ही कविता स्फुरली आहे. सोपानदेव टवटवीत राहिले आहेत कारण त्यांचे पाणी




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

निर्मळ आहे. जिवंत, प्रवाही असे ते आहे. आज सोपानदेवसाठी पार करीत असले तरी त्यांची काव्यबुद्धि नाठी (याने नकारात्मक निगेटिव्ह) झालेली नाही. संतांनी 'मीच ब्रह्म' 'अद्वैत' त्यांना शिकवले आहे. आणि काव्य हे जर ब्रह्माचेच एक नवे रुप असेल तर काव्यब्रह्माचे उपासक सोपानदेव हे नकारात्मक विचाराप्रत जातीलच कसे ? त्यांच्या साध्यासुध्या पत्रातून काव्य, अध्यात्म व एकूण जीवनातली मंगलता ह्याची स्तोत्रेच स्रवतात. अशा ह्या काव्य ब्रह्माच्या थोर उपासकाचे आम्ही अभिनंदन करतो.

## साहित्य'वसंत' काटदरे

मराठी मासिकांच्या ह्या स्पर्धेच्या कालात एखादे मासिक (आणि तेही काही निष्ठा, मूल्ये मानणारे) पंचवीस वर्षे अविरत-पणे (जोड अंक वगैरे न काढता) चालणे, चालविणे हे काम वाटते तेवढे सोपे नाही. (जावे त्याच्या वंशा) मासिकाची स्वप्ने पडणे आणि मासिकाचे 'गठ्ठे' (अंगावर) पडणे ह्या गोष्टी साधारण-पणे जर्षाच्या आतच घडतात आणि मग ते स्वप्न (अनेक देणी मागे ठेवून) त्या गठ्ठयांच्या खालीच गुदमरून जाते. पण केवळ वैयक्तिक अनुभव, जिद्द, काही श्रद्धा आणि त्या श्रद्धांसाठी पडेल ते मोल हसतहसत मोजण्याची वृत्ति ह्यामुळे ह्या मासिकाच्या (तशा आतबट्ट्याच्या) धंद्यातही ज्यानी मूल्येही सांभाळलीत आणि धंदाही पडू दिला नाही अशा संपादकात 'वसंत' मासिकाचे संपादक दत्तप्रसन्न काटदरे ह्यांचा समावेश होतो. २५ वर्षांपूर्वी 'वसंत'चा पहिला अंक निघाला त्यानंतर गेली २५ वर्षे 'वसंत' पाहतो, वाचतो आहे. स्वातंत्र्यपूर्व कालात व नंतरच्या काळातही 'वसंत'ने अनेक महत्वपूर्ण गोष्टी केल्या. नवे प्रयोग केले, लेखमाला दिल्या. पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या 'मौलिक' लेखनाची देणगी ही वसंतची फार मोठी देणगी ! ललित लेखन तर मासिकाला द्यावेच लागते. पण १५-२० पानी मोठे लेख देऊन जनजागरणाच्या कामात काही धाडसे करावी लागतात हेही 'वसंत'ने सिद्ध केले आहे. काटदरे स्वत: कडवे राष्ट्रवादी आहेत. त्यामुळे त्यांचे संपादकीय लेखन (मर्यादा पाळूनही) प्रखर होत असे. त्यानी न्याय सांभाळला. पण अन्याय्य वा अयोग्य तडजोडी मात्र स्वीकारल्या नाहीत. जे पटले तेच केले. तेच मांडले. वैयक्तिक लफडी, कुलंगडी-भानगडी ह्यात 'मॉरबिड' असा रस घेतला नाही. व्यवसायात बरे वाईट अनुभव येतच असतात. पण त्यामुळे मनाची ऋजुता, प्रसन्नता, संयम, चांगुलपण त्यांनी कधी ढळू दिले नाही. राष्ट्रनिष्ठा महत्वाची मानली, पण त्यातून कळत न कळत येणारी रुक्षता, कडवे व कडवटपण, एकांतिकता ही त्यांनी टाळली. ते रसिक आहेत. गाण्याच्या मैफलीत आणि नाटकाच्या प्रेक्षागारातही ते तितकेच 'रसज्ञ' आहेत. 'मर्मज्ञ' आहेत. ते चांगले वक्ते आहेत. साक्षेपी संपादक आहेत. मागे एकदा एका खाजगी चर्चेत त्याना मासिकांच्या मुखपृष्ठावर येणाऱ्या बायांच्या चित्रांसबंधी प्रश्न विचारला गेला. तेव्हा त्याबाबत प्रामाणिकपणे काही नवे प्रयत्न करण्याचे त्यानी मान्य केले. त्याबाबत 'वसंत'ने काही नवे प्रयोगही (रिस्क घेऊन) केले हे मला ठाऊक आहे. 'वसंत'ने २५ पावसाळे पाहिले तसेच २५ वसंतही पाहिले आहेत. वर्षाने वसंत फुलविला आहे. आणि 'वसंत'च्या यशाने काटदऱ्यांची मान ताठ होऊ शकण्यासारखी असली तरी ती विनयशील आहे. चांगल्यांच्या चांगल्या सूचना मान्य करण्याइतपत ती सहिष्णु आहे आणि मूल्ये सांभाळण्याइतपत ती जिद्दीही आहे. म्हणूनच केवळ पंचवीस वर्षे मासिक चालवले ह्याबद्दल हे अभिनंदन नाही. ते चांगले चालविले. काही श्रद्धेने चालविले ह्याबद्दल अभिनंदन. वसंत मासिक व वसंतचे संस्थापक-संपादक दत्तप्रसन्न काटदरे ह्यांचे आम्ही मन:पूर्वक अभिनंदन करतो. दोघांनाही दीर्घायु लाभो हीच सदिच्छा व्यक्त करतो.

—आदित्य


## पाहिजे

दीपावली मासिकाच्या कार्यालयांत हुशार कारकूनाची जरूरी आहे. वितरण, एजंटांशी पत्रव्यवहार, इंग्रजी टंकलेखनाची सवय इत्यादी माहिती असल्यास प्राधान्य दिले जाईल. पगाराची अपेक्षा, वय शिक्षण वगैरे माहितीसह स्वत:च्या हस्ताक्षरात त्वरित अर्ज करावेत. प्रत्यक्ष भेटू नये.

पत्ता—दलाल आर्ट स्टुडिओ,
४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४.


[पृष्ठ ५७ वरुन ..... इंद्रधनुष्य]

हे प्रदर्शन भारतात प्रवास करीत होते ते ऑस्ट्रेलियन सरकारच्या वतीने. सरकारचा कलाविषयक दृष्टिकोण नाही म्हटले तरी नवमतवाद्यांपेक्षा जास्त सोवळा असतो. या प्रदर्शनात 'ॲबस्ट्रॅक्ट' धर्तीची चित्रे तुरळक होती खरी पण प्रेक्षकाच्या डोळ्यातील बुबुळेच विस्मयाने बाहेर काढणारी 'पॉप' अगर 'ऑप' नामक आजकालच्या अत्याधुनिक शैलीतील चित्रे येथे नव्हती.

असे प्रदर्शन थोडक्यात बरेच काही शिकवून जाते. उपरि-निर्दिष्ट एलिझाबेथ यंग व त्यांचे चित्रकार यजमान रॉबर्ट कॅम्पबेल हे पन्नाशीसाठीतले जोडपे प्रदर्शनानिमित्ताने मुंबईत मुक्काम करून होते. ऑस्ट्रेलियन कलेचे यथार्थ (व जास्त जिवंत) दर्शन घडविणारे अनुबोधपटही त्यानी येथे दाखविले. या सर्व गोष्टींचा लाभ कितीशा कलापिपासू मराठी-भाषिकांनी घेतला असेल?

☆☆☆





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका




—ज्ञानेश्वर नाडकर्णी

## गुजराती जानपद नाट्य

गेल्या महिन्यात येथल्या इंडियन नॅशनल थिएटरने रंगभवनात एक अभिनव नाट्यमहोत्सव साजरा केला. INT या संस्थेने आजपर्यंत अनेक गुजराती नाटके व बरीचशी नृत्यनाट्ये रंगमंचावर आणलेली आहेत. संस्थेचे अध्वर्यु दामू जव्हेरी आणि त्यांच्या भोवतालचे कार्यकर्ते योजकता, सुसंघटित व्यवस्था आणि कल्पकता या गुणांचा आदर्श आपल्या डोळ्यांपुढे ठेवणारी मंडळी आहेत. एके काळी दिग्दर्शक आत्माराम भेंडे यांचाही INT शी घनिष्ठ संबंध होता; पुढे दिवस अनेक प्रकारे बदलले एवढे खरे.

परवाच्या महोत्सवात गुजरातच्या काही अस्सल जानपद कलांचे दर्शन INT ने घडविले. सुरुवात झाली 'दायरो' नावाच्या काव्यगायनासारख्या कार्यक्रमाने. मराठीत गेल्या काही वर्षात काव्यवाचनाचा कार्यक्रम फारशा उत्साहाने कोणी करीनासे झाले आहे. कदाचित् आजकालच्या 'वन्–मॅन शो'पुढे या कार्यक्रमांचा प्रभाव पडत नसेल! उलट 'दायरो'मध्ये दोनचारच ठळक कवी भाग घेतात. 'वन्–मॅन शो' मधल्या एखाद्या पु. ल. देशपांडयांसारखे एकेका कवीचे श्रोतृवृंदावर तास तास अधिराज्य असल्याचे प्रत्ययाला येते.

उर्दू काव्याचा मुशाइरा मी क्वचित्च ऐकलेला आहे. पण या गुजराती काव्यदर्शनात त्याचीही झाक काही कमी नसते. श्रोते काव्यानंदात न्हाऊन निघत असताना उत्स्फूर्तपणे दाद देतात. थोडेथोडेके श्रोते नव्हे तर काही हजार! मराठी कवीला अशी दाद मिळते ती छोट्या छोट्या सभांतून — एरवी धार्मिकपणे प्रत्येक कवितेच्या अखेरीला टाळ्यांचा मोजका नैवेद्य तेवढा आपण त्याला अर्पण करतो!

महोत्सवात तीन नाटके सादर केली गेली. दिल्ली गुर्जर मंच या संस्थेने भारताच्या राजधानीतून आपले 'जसमा ओडन' हे भवाई शैलीतले नाटक मुद्दाम येथे आणले होते. दिल्लीत स्थायिक झालेल्या गुजराती भाषिकांनी मोठ्या हौसेने ही संस्था स्थापन केलेली आहे. दिग्दर्शन शांता गांधी यांचे. शांता, दिना (आता पाठक) व तरला (आता मेहता) या तीन बहिणी गेली पंचवीसएक वर्षे गुजराती रंगमंचावर या ना त्या प्रकारे वावरत आहेत. इंडियन पीपल्स थिएटरमध्ये शांता व दिना यांना नाट्यकलेचे बाळकडू मिळाले व ते स्वातंत्र्यपूर्व कालात. पुढे शांताबेन बडोद्याला गेल्या. १९५७ साली P.E.N. परिषदेच्या प्रतिनिधींपुढे बडोदा विद्यापीठाच्या नाट्यविभागाने जो भवाईचा प्रयोग केला त्यात त्या सहभागी होत्या असे वाटते. अलीकडे त्या अल्काझींच्या 'नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा'मध्ये अध्यापिका आहेत. (तरला सर्वात धाकटी; गिरिश कर्नाडांच्या 'ययाती'मध्ये शर्मिष्ठेचे काम करणारी!)

'भवाई' हा प्रकार थोडाबहुत आपल्या तमाशाशी तुलना करता येईल असा आहे. याचा अर्थ एवढाच की प्रेक्षकांशी सुरूवातीपासून खेळीमेळीचे संबंध प्रस्थापित करणारी त्यातील पात्रे पुढे मुख्य नाटकातील (वर्गातील) प्रमुख भूमिका करतात. एक फरक मात्र फार मोठा आहे. या गुजराती जानपद-नाट्यात स्त्री-पुरुषांचे कपडे नानारंगी आणि म्हणूनच डोळ्यांना सुख देणारे असतात. तमाशाची रंगत+गुर्जर प्रदेशाचे रंग=भवाई असे समीकरण मांडणे काही कठिण नाही.

खुद्द INT ने सादर केलेली 'जेसल तोरल' व 'गढ जुनो गिरनार' ही जितुभाई मेहता यांची नाटके कानांना आणि डोळ्यांना जास्तच सुखावणारी. दोन्हींची नायिका उर्मिला भट ही बडोद्याची एक लावण्यवती गृहिणी आहे. (गुजरात्यांबद्दल आपली कल्पना ते तूप खाणारे म्हणून! पण सडपातळ बांध्याच्या नटी असतात त्या त्यांच्या! आपल्या नव्हे! शिवाय आपल्यातल्या शेलाट्या बांध्याच्या नटी असतात त्या मुळी कर्नाटकातल्या! उदा. आशा पोतदार, लता जूकर, सुनंदा तोरगल! गुर्जर रंगमंचावर 'नाइट'चे

**'जसमा ओडन'मध्ये बेभानपणे नाचणारी ज्योती व्यास**



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तूप नसते हाच याचा अर्थ! ) अभिनयात ती किंचित् कमी पडली तरी वांधा नाही; कारण हा नाटचप्रकारच असा असतो की त्यात किंचित् जुनाट घाटणीचा, ढोबळ अभिनय सहज खपून जावा.

'जसमा ओडन' मधील ज्योती व्यास ही सुद्धा अशीच एक गृहिणी. नर्तकीच्या भूमिकेत ती उर्मिलाबेनइतक्याच चपलतेने नाचली. नायिका जसमा ही भूमिका तिच्याच वाटचाला आली होती. या तीनही नाटकात जेव्हा डौलदार जानपद वेषातले तरुण फेर धरून टिपऱ्यांचा नाच करू लागतात तेव्हा प्रेक्षकांतून सरळ उठून त्यांच्यात सामील व्हावेसे वाटते! हा प्रकार बायकी आहे अशी आपली पारंपारिक कल्पना! परंतु 'रॉक ॲन्ड रोल'चा नक्षा उतरविणारे जे अनेक देशी समूहनृत्यांचे प्रकार आहेत त्यात गुजराती रास-गरब्याला अग्रगण्य स्थान मिळावे.

'जसमा ओडन' मध्ये पिछाडीला जे गायक—वादक बसलेले होते त्यात लांबच लांब सनईसारखी दिसणारी तुतारी वाजविणारा एक होता. मधूनमधून ढंगदारपणे त्याने तुतारी फुंकली की देहभान हरपून जाई. 'जेसल तोरल' व 'गढ जुनो गिरनार'चे संगीत दिग्दर्शक अविनाश व्यास हे विवाहाने आपल्या महाराष्ट्राला बांधलेले. त्यांची गहिऱ्या आवाजाची प्रमुख गायिका उषा रेगे हीसुद्धा महाराष्ट्रीय. INT ने भाषाविग्रह न होऊ देता असा बराचसा लोकसंग्रह करून ठेवलेला आहे. मनसुख व गौतम जोषी यांनी उभ्या केलेल्या या दोन नाटकांचे नेपथ्य फिरत्या रंगमंचाच्या साऱ्या युक्त्या उपयोगात आणते. नाटकाची जात, पात्रांच्या पोशाखांचा रंगविलास, नेत्रोद्दीपक नेपथ्य आणि अभिजात गायनवादन यांचा इतका उत्कृष्ट मीलाफ (अन् सडपातळ अंगाचे नटनटी! ) मराठी रंगभूमीवर कितीसे पाहायला मिळतात?

## रावबहादूर धुरंधरांचा जीवनपट

माझ्या विलायतेच्या पहिल्या वारीत एकदा ऑक्सफर्ड येथे आर्चर नावाच्या गृहस्थाचे भारतीय चित्रकलेवरील व्याख्यान ऐकण्याची मला संधी लाभली. आर्चर हा लंडनच्या व्हिक्टोरिया ॲन्ड आल्बर्ट म्युझियमचा प्रमुख अधिकारी. भारतीय चित्रकलेचा त्याचा गाढा अभ्यास (परदेशी लोकच आपल्या कलांचा जास्त कसोशीने अभ्यास करतात असे दिसते! ); आपल्या देशाच्या चित्रशिल्पादी कलांतील स्थित्यंतरांचा त्याने आपल्या पुस्तकातून कालानुक्रमे आलेख काढलेला आहे.

आर्चरच्या व्याख्यानासंबंधी आज माझ्या आठवणीत एकच गोष्ट आहे. व्याख्यान चालू असताना तो गेल्या सत्तरऐंशी वर्षांतल्या प्रमुख भारतीय चित्रकारांच्या चित्रांच्या स्लाइडस् दाखवीत होता. त्यातील एक स्लाइड चक्क रावबहादूर एम्. व्ही. धुरंधरांच्या एका प्रातिनिधिक चित्राची होती. ती पाहून मी हरखून गेलो. केवळ एका मऱ्हाठी चित्रकाराच्या चित्राची प्रतिकृती अशा व्याख्यानांतर्गत उल्लेखरूपी बहुमानाच्या कोंदणातून माझ्या महाराष्ट्रापासून हजारो मैल दूर असलेल्या ऑक्सफर्ड शहरी मला पहायला मिळाली म्हणून !

धुरंधरांचा जन्म १८ मार्च १८६७ रोजी झाला. अव्वल इंग्रजीच्या ऐन बहराच्या काळात ह्या चित्रकलेच्या पंडिताची कला फुलली. अक्षरशः बाळपणापासून तो दुसऱ्या महायुद्धाच्या काळात घडलेल्या मृत्यूपर्यंत रावबहादूरांच्या हाताने रेखाटलेली, रंगविलेली चित्रे जानेवारीच्या अखेरीस एका जन्मशताब्दीसंलग्न प्रदर्शनाच्या निमित्ताने मुंबईकरांना पाहावयास मिळाली. हे प्रदर्शन मुंबई विद्यापीठाच्या दीक्षान्त सभागृहात काही दिवसापुरतेच भरलेले होते अन् त्यामुळे नेहमी चित्रकला—प्रदर्शने पाहणाऱ्यांनासुद्धा ते नीटसे पाहण्याचा योग आला की नाही ही शंकाच आहे !

मला वाटते, रावबहादूरांच्या शैलीचा हुबेहूब कित्ता गिरविणाऱ्या त्यांच्या कन्या अंबिका धुरंधर यांच्या प्रेरणेमुळे हे मोठे प्रदर्शन उभे राहू शकले. किशोर व कुमारवयात धुरंधरांनी केलेली रेखाटणे त्यात होती. नंतर ऐन उमेदीच्या काळात मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये त्यांनी शिक्षण घेतले. त्या वेळचे त्यांचे ब्रिटिश शिक्षक, त्याचप्रमाणे आबालाल रहिमान यांच्यासारखे प्रतिभावंत गुरु आणि सहाध्यायी यांच्या चेहऱ्यामोहऱ्याचे व चित्रकलेचे सम्यक् दर्शन तत्कालीन छायाचित्रे, रेखाटणे व चित्रांच्या प्रतिकृती यांच्या द्वारे घडत होते.

धुरंधरांच्या चित्रकलेविषयी नीरक्षीरविवेक करणे या ठिकाणी अप्रस्तुत ठरेल. त्यांचा चित्रकलाविषयक दृष्टिकोण तत्कालीन संकेतांच्या जाचक चौकटीत सापडलेला असा होता. मानवी आकृती जशी दिसेल तशी काढायची, इतिहासातील अगर पुराणातील प्रसंग डोळ्यापुढे उभे करून रूढ पद्धतीने चित्रफलकावरील व्यक्ती-व्यक्तीच्या स्थानांची रचना करायची आणि या व्यक्तींच्या प्रत्यक्ष स्वरूपाचे आदर्शीकरण करायचे अशी त्यांच्या चित्रकलेची पठडी होती. त्यांनी व्यक्तिचित्रेही बरीच रंगविली. एक कष्टाळू, सुखवस्तू, संसारी चित्रकार म्हणून धुरंधरांनी आपली हयात वेचली. त्यांच्या कन्येने मोठ्या प्रेमाने अनेक वर्षांचा पसारा गोळा करून हे प्रदर्शन भरविले होते.

हे प्रदर्शन पाहून एकच विचार मनात आला. जे. जे. स्कूल ऑफ आर्टने या शहरातील आपल्या दीर्घकालीन अस्तित्वात भारतीय चित्रकलेला आपल्या परीने घडविले आहे, जडविले आहे. (काही म्हणतील रडविलेसुद्धा असेल! पण एखाद्या संस्थेच्या कारकीर्दीतील चढउतार अपरिहार्य असतात. शिवाय तशी सरकारी संस्था! म्हणजे मर्यादा आल्याच.) हा सारा इतिहास परिश्रमपूर्वक लिहिला गेला पाहिजे.

एकदोन वर्षांपूर्वी येथील जहांगीर आर्ट गॅलरीत 'पश्चिम भारतातील चित्रकलेची ७५ वर्षे' या नांवाचे एक अभिनव प्रदर्शन भरले होते. त्या निमित्त श्री. जगमोहन यानी नेमका हाच इतिहास एका पुस्तिकेत शब्दांकित केलेला होता. पण प्रत्यक्ष कार्य त्याहीपेक्षा फार फार मोठ्या व्याप्तीचे आहे. आणि सरकारी पाठिंब्यानिशी कोणीतरी ते लवकर हाती घेणे इष्ट आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## ऑस्ट्रेलियन चित्रकला

गेल्या महिन्यात ऑस्ट्रेलियन सरकार व ललित कला अकादमी यांनी एकत्र येऊन येथल्या म्युझियमच्या कुमारस्वामी सभागृहात ३४ ऑस्ट्रेलियन चित्रांचे एक प्रदर्शन भरविले होते. वर्षभरापूर्वी याच जागेत मेक्सिकन चित्रकारांची चित्रे पाहावयास मिळाली होती. त्यानंतर एका विशिष्ट देशाचे इतके सांगोपांग दर्शन 'घडविणारे हेच प्रदर्शन असावे.

ऑस्ट्रेलिया हा देश आपल्या राष्ट्रकुलाचा सभासद असूनही आपल्याला त्याविषयी फारशी माहिती नाही. नाही म्हणायला स्वातंत्र्योत्तर काळात आपण किमान दोन मातब्बर महाराष्ट्रीय तेथे पाठविलेले आहेत. एक, भारताचे हाय कमिशनर म्हणून रँग्लर सर रघुनाथ परांजपे आणि दुसरे, पुणे नभोवाणीच्या शेतकरी कार्यक्रमाचे सूत्रधार या नात्याने व्यंकटेश माडगूळकर! दोघांनीही, त्याचप्रमाणे रँग्लरांच्या कन्या शकुंतला परांजपे यांनी, आपल्या ऑस्ट्रेलियातील वास्तव्याबद्दल विस्ताराने लिहिलेले आहे; ते वाचलेल्याना, वयाने अजून किशोरावस्थेत असलेल्या या पांचव्या खंडावरील धाडसी, अनिबंध अन् जिद्दीच्या जीवनपद्धतीची यथार्थ कल्पना आलेली असेल.

या प्रदर्शनाच्या निमित्ताने भारतात आलेल्या ऑस्ट्रेलियन कलासमीक्षक, एलिझाबेथ यंग, यानी ४ फेब्रुवारीच्या 'इलस्ट्रेटेड वीकली'त ऑस्ट्रेलियन कलेसंबंधी जो लेख लिहिलेला आहे त्यात जिज्ञासूंना कितीतरी सुरस आणि चमत्कारिक माहिती मिळेल.

ऑस्ट्रेलियाचे क्षेत्रफळ ३० लक्ष चौरस मैल असले तरी त्याची लोकसंख्या जेमतेम एक-सव्वा कोटी आहे. सन १७८८ मध्ये इंग्लंडातल्या तुरुंगांत जागा नाही म्हणून शिक्षा भोगायले पाठविलेले कैदी या विस्तीर्ण 'बेटा'वर येऊन उतरले. त्यांच्यावर नजर ठेवायला सोबत सशस्त्र रखवालदारही होते! हेच आजच्या ऑस्ट्रेलियन नागरिकांचे आद्य पूर्वज!

खरोखरी याच कैद्यांनी ऑस्ट्रेलियात पहिल्या वसाहती वसविल्या. खंडातील उजाड जमीन त्यानीच कसली. या कुंवार भूमीचा स्पर्श त्याना होताच त्यांच्या चारित्र्यातही मोठे स्थित्यंतर झाले! आपल्या अब्रूवरचा कलंक त्यांनी निढळाच्या घामाने धुवून टाकला.

ही ऐतिहासिक आणि भौगोलिक माहिती येथे देण्याचे कारण म्हणजे याच जिवंत अनुभवाची प्रेरणा मुंबईच्या प्रदर्शनातील ३४ चित्रांपाठी स्पष्ट दिसत होती. बऱ्याच चित्रकारांनी रंगविला होता तो भोवताली दिसणारा मुलूख. सिडने नोलनसारख्या जागतिक कीर्तीच्या चित्रकाराचे चित्र होते रात्रीच्या भयाण अंधःकारात दलदलीतल्या उंच गवतातून मुष्किलीने मार्ग कापीत चाललेल्या, जन्मठेपेच्या फरारी कैद्याचे! रसेल ड्रिसडेल हा एक अव्वल दर्जाचा निसर्गचित्रकार; त्याच्या चित्रात धगधगत्या लाल रंगांनी साकार केली होती ती ऑस्ट्रेलियाच्या मध्यभागी असलेली उजाड, वैराण 'लाल भूमी'!

अठराव्या शतकाच्या अखेरीला ज्यानी आजच्या ऑस्ट्रेलियन कलेचा पाया घातला तेही कैदीच होते! टॉमस वेनराइट हा त्या काळचा एक मोठा व्यक्तिचित्रकार; खोट्या नोटा तयार करण्याच्या आरोपावरून त्याला इंग्लंडात शिक्षा झाली होती. छानछान कपडे करून लंडनच्या साहित्यिक अड्ड्यात उठबस करणाऱ्या या प्राण्यावर कसल्या तरी विषप्रयोगाचाही वहीम होता.

१७९४ साली सिडने बंदराचे वास्तववादी चित्र रेखाटणारा टॉमस वॅटलिंग हासुद्धा एक फोर्जर होता; त्याची शिक्षा पुढे माफ करण्यात आली! जोसेफ लिझॅट नावाच्या पूर्वाश्रमीच्या फोर्जरने एका चर्चच्या देव्हाऱ्याच्या चौथऱ्यावरील चित्र रंगवून अशीच माफी मिळविली! टॉमस ग्रीनवे नावाचा गुन्हेगार ऑस्ट्रेलियात आल्यानंतर सरकारी आर्किटेक्टच्या पदाला पोचला! त्याने ज्या चर्चेसची, पुलांची आणि सरकारी इमारतींची वास्तुरचना केली त्यांच्याकडे अजूनही अभिमानाने बोट दाखविले जाते.

वसाहतीचे आतापर्यंतचे वयच मुळी उणेपुरे २०० वर्षांचे; त्यामुळे सर्वच क्षेत्रात ऑस्ट्रेलियन लोकाना नव्याने परंपरा निर्माण कराव्या लागल्या. आधुनिक विज्ञानयुगाचा पूर्णपणे संपर्क तुटलेल्या अशा भटक्या वन्य जमाती या भूमीवर पूर्वीपासून आहेत. त्यातील कलावंत झाडाच्या सालीवर मातीपासून केलेल्या रंगाने चित्रे रंगवितात. प्रस्तुत प्रदर्शनात या जमातींचे प्रतिनिधित्व बिलकूल नव्हते ही एक बुचकळ्यात टाकणारी गोष्ट. अर्थात् त्यामुळे प्रदर्शनाचा एकजिनसीपणा नाहीसा झाला असता व लोकांनी केवळ एक कुतूहलाची बाब म्हणून त्या विभागाकडे पाहिले असते! (तत्सम जमातींचे प्राचीन संस्कृतीमधील मूलस्रोतसदृश स्थान लक्षात घेऊन मेक्सिकन प्रदर्शनात मात्र त्याला रास्तपणे महत्त्व देण्यात आले होते.)

पर्यायाने युरोपियन कलेची परंपरा हीच अमेरिकेत अगर ऑस्ट्रेलियात वसाहत करणाऱ्या श्वेतवर्णीय कलावंताचीही परंपरा होय. जगाच्या आग्नेय टोकाकडून या खंडातील खऱ्या उमेदीच्या कलावंतांचे डोळे वायव्येकडील आपल्या 'माहेरा'कडे लागले असल्यास नवल नाही. प्रदर्शनात ज्यांची चित्रे लावलेली होती त्यांच्यापैकी नावाजलेले कलावंत ऑस्ट्रेलिया सोडून नशीब कमाविण्यासाठी लंडनला जाणारे, पुष्कळदा तेथेच स्थायिक होणारे, क्वचित् मायदेशी परत येणारे अगर आग्नेय–वायव्येच्या दरम्यान वाऱ्या करणारे असे होते. आज ऑस्ट्रेलियाबाहेरच्या जगात जर कोणा एका चित्रकाराचे नाव श्रेष्ठ पाश्चात्य चित्रकारांच्या बरोबरीने घेतले जात असेल तर ते सिडने नोलनचे; पण याचेसुद्धा या प्रदर्शनात एकच चित्र होते.

विसाव्या शतकात प्रचलित असलेल्या जवळजवळ सर्व चित्रणशैलीतील चित्रे या शेलक्या चौतिसात होती. ॲडम आणि ईव्ह यांच्या अधःपतनाचे एका चित्रकाराने काढलेले चित्र बाह्यतः पारंपरिक शैलीतले वाटावे असे होते (त्यामुळे एक अतिशय सनातन शैलीतले चित्रकार "वा! हेच काम ते खरे!" अशा अभिप्रायाने ते वाखाणताना मी पाहिले!) त्यात बायबलाच्या पहिल्या भागातील ॲडमच्या वंशजांच्या —आणि त्यांच्या जीवनातील स्त्रियांच्याही — आकृति स्नायूनस्नायूसुद्धा अतिशय वास्तव पद्धतीने रंगविलेल्या होत्या. वास्तविक ही शैली साल्वेदॉर दाली ह्या, आकडेबाज मिशांमुळे गाजलेल्या, सरिआलिस्ट चित्रकाराच्या अनेक चित्रांकरवी निदानपक्षी जाणकारांच्या तरी ओळखीची व्हायला हवी.

[ पृष्ठ ५४ वर पहा ]




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



## मुंबई व उपनगर साहित्य संमेलन

मुंबईत पहिले संमेलन भरले १९२४ साली. अध्यक्ष होते कृ. अ. केळुस्कर. आणि एकोणिसावे संमेलन मुंबईच्याच एका उपनगरात–म्हणजे क्षेत्र पार्ले येथे भरले–१९६८ साली. वास्तविक क्रमानेच विचार करायचा झाला तर हे संमेलन चौतिसावे (चूकभूल द्यावी घ्यावी) असायला हवे होते. पण उपनगरे पुष्कळ असली तरी 'साहित्यिक' उपनगरे एकूण कमी (किंवा साहित्यविषयक उत्साह कमी) म्हणून अवघी १८ संमेलने भरली आणि यंदा फेब्रुवारी अखेरीस १९ वे झाले. अध्यक्ष प्रा. रा. भि. जोशी वय वर्षे साठ (खरं नाही वाटत). हास्य प्रसन्न. वृत्ति रसिकाची. वागणे–सौजन्यशील. निगर्वी. गोडव्याचे. त्यामुळे त्यांची निवड होताच मनाला बरे वाटले. स्वागताध्यक्ष होते गंगाधर गाडगीळ (आता मुक्काम पार्ले) संमेलन मोठ्या उत्साहात पार पडले. पार्ले आणि साहित्य–नाट्य, संगीत–आदि कला यांचे नाते फार जुने. त्यामुळे उत्साहात पार पडले नसते तरच नवल. साहित्यिक गाडगीळांनी केलेले पार्ल्याचे वर्णन हे (स्वागताध्यक्षीय) परंपरेला साजेसे झाले असले तरी पार्ले आणि पुणे यांची जी त्यानी तुलना केली ती कुणालाही पटण्यासारखी आहे. फार मोजके आणि मार्मिक (पार्ले) चित्रण त्यानी केले आहे. तर प्रा. रा. भि. जोशी ह्यानी आपल्या भाषणात प्रारंभी स्थूल स्वरूपाचा वाङ्मयीन आढावा घेतला. नंतर 'कलेसाठी कला' ह्या सिद्धांताच्या अनुषंगाने व्यक्त झालेल्या मतांचा त्यानी परामर्ष घेतला आहे. साहित्य निर्मिती मागल्या प्रेरणा आणि ललितकलांचे मानवी व्यवहाराशी असलेले नाते ह्या अनुषंगाने श्री. बा. सी. मर्ढेकर ह्यांनी जे लेखन केले आहे, त्याचाच विचार व विस्तार प्रा. जोशी ह्यानी केला असून आपले भाषण त्या अनुषंगाने विवेचन करण्यात खर्ची घातले आहे. कला आणि साहित्य यासंबंधीच्या मर्ढेकरी सिद्धातांची क्रांतिकारकता त्यानी पटवून दिली आहे. मर्ढेकरांनंतरच्या काव्य आणि समीक्षेने घेतलेले नवे रूप आज कसे स्थिरपद होत आहे व दिलीप चित्रे आदि मंडळी हा विचार कसा विकसित करीत आहेत हे सांगून व दिलीप चित्र्यांच्या सिद्धांतातून कवितेचे नवे रूप कसे अभिव्यक्त होते ते जोशी सांगतात. प्रा. जोशी ह्याच्या भाषणात ह्या नव्या समीक्षेचा विस्तृत परामर्ष घेतला गेला आहे. त्याच्या शक्ति–मर्यादांची, त्यातून निर्माण होणाऱ्या नव्या समस्यांची नोंद त्यानी केली आहे.

हे सारे भाषण वाचल्यानंतर एक विचार मनात येतो तो असा की, अध्यक्षीय भाषण म्हणजे नुसताच 'सर्व्हे' असावा काय? त्या भाषणात प्रा. जोशी ह्यांचे प्रतिपादन फार मर्यादितपणे आले आहे. ही जी नवी समीक्षा वा जे कलाविषयक सिद्धान्त मांडले गेले आहेत त्यांचे नुसते दिग्दर्शन न करता प्रा. जोशांनी स्वतःचे प्रतिपादन मांडले असते तर? प्रा. जोशी यांचे वाचन, चिंतन, मनन मला ठाऊक आहे. काव्यशास्त्र, काव्यानंदाचे स्वरूप-प्रक्रिया यासंबंधीचे त्यांचे विवेचन मौलिक ठरले असते. केवळ 'नवसाहित्य' हा विषयसुद्धा त्यांच्या मूलगामी चिंतनाने काही आगळेच सौंदर्य प्रगट करू शकला असता.

संमेलनाच्या निमित्ताने जे परिसंवाद झाले त्यात "नियतकालिका" संबधी जो परिसंवाद झाला तो गाजला. नव्या "समीक्षा" पद्धतीत एक 'अहंगंडात्मक' दोष शिरू पहात आहे असे मला वाटते. प्रतिभा, पारिजात, ज्योत्स्ना, साहित्य, अभिरूची, सत्यकथा, आलोचना, छंद, असो वगैरेचे उल्लेख करीत असताना काही सिद्धान्त व मक्तेदारी गृहित धरली जाते. आणि जे बंद पडले ते चांगले (च) असा जाणीवपूर्वक सिद्धांत मांडला जातो. वास्तविक किर्लोस्कर, मनोहर, हंस, वसंत, सह्याद्रि आणि वाङ्मयशोभेसारख्या काही जुन्या मासिकांनी वाङ्मयीन अभिरुची जोपासण्याचे कार्य केले आहे. मराठी मासिकातल्या अनेक चांगल्या, नव्या वाङ्मयीन परंपरा वरील मासिकानी रुढ केल्या आहेत. परंतु उल्लेख करताना मात्र जी मासिके बंद पडली वा आज यथातथा चालतात अशा मासिकांचीच सतत वकिली केली जाते. व वाङ्मयीन अभिरुचीची (स्वरुप व कार्य) ठेकेदारी जणु आपल्याकडे 'ईश्वरदत्त' देणगी म्हणून चालत आली आहे असे मानण्याची जी 'टूम' आली आहे ती फारशी स्पृहणीय नाही असे म्हणावेसे वाटते. ह्यातून जी मेली तेवढीच उत्तम व जगली ती वाईट, अभिरुचीहीन असा एक अपसिद्धांत रुढ होण्याची भीति संभवते. ज्योत्स्ना, पारिजात, अभिरूची, प्रतिभा ह्याचेही काही स्थान आहे. साहित्य विषयक श्रद्धा व अभिरुची जोपासण्याचे कार्य त्यांनी केले आहे हेही मान्य. पण त्यांनीच केले आहे असे एकांतिकपणे म्हणत राहण्याने मात्र अभिरुचिसंपन्नता सिद्ध होत नाही. तूर्त इतकेच! साहित्यिकांची अक्षरे, मराठी नियतकालिके व वसंत सरवटे ह्यानी काढलेली साहित्यिकांची व्यंगचित्रे ह्यांचे प्रदर्शन प्रेक्षणीय होते.

**स्वागत....**

मासिकांची संख्या वाढत आहे. (डरोमत!) २६ जानेवारीला 'आस्वाद' निघाले. मार्च मध्ये 'निषाद' निघाले. ह्या दोन्ही भावंडांना आम्ही सुयश चिंतितो.

**—सारस्वत**






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

GD. NO. MH-450 | Licence No. 170 to post without pre-payment | APRIL 1968


# अधिक धान्योत्पादन !
# अधिक फायदा !!
# अधिक बचत !!!

यांसाठीं

किर्लोस्कर

रजिस्टर्ड ट्रेड मार्क

# डिझेल एंजिन्स

यांचीच निवड आवश्यक आहे...

...कारण, अत्यंत कार्यक्षम व बिनतक्रार चालणारी अशी ही किर्लोस्कर एंजिनें, अधिक धान्योत्पादन व अधिक कमाई करण्यास अत्यंत उपयुक्त असल्याबद्दल त्यांची ख्याति आहे. किर्लोस्कर एंजिनें चालविण्यास लागणारा तेलाचा खर्च, बाजारांतील इतर एंजिन्सला लागणाऱ्या खर्चाच्या मानानें फारच कमी येतो; त्यामुळें तेलाच्या खर्चांत दर दिवशीं अंदाजें दोन रुपयांची बचत होते.

याशिवाय देशांत किर्लोस्कर डीलर्स गांवोगांवी पसरले असल्यामुळें विक्रीनंतरची देखभाल करण्यास व त्यांस कामाचे अस्सल सुटे भाग मिळण्यास अडचण पडत नाहीं.



बेबी १, तीन हॉर्स पॉवर






एव्ही १, पांच हॉर्स पॉवर



१ एम्, दहा हॉर्स पॉवर

किर्लोस्कर ऑइल एंजिन्स, लिमिटेड.

रजि. ऑफिस. एल्फिन्स्टन रोड, पुणे-३ (भारत)

KO: 4446 MAR


Cover Printed At Asha Printery, Bombay-4

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट